


You can resize and move this box in any PDF Application like Adobe Acrobat Reader.

No specific pages. See whole book.




This book contains the so-to-say new or amended Pooja Vidhi which uses more of "Hindu" or "Indian" outwardly-looks/words/terms in place of "Islamic" or "Arabic" outwardlylooks/words/terms, used in original Pooja Vidhi since formation of Satpanth.
It is understood that this is done to attract Hindus.

॥ ॐ ॥

# श्री सतपंथ घटपाट पूजा यज्ञ विधी




प्रथम आवृत्ति ) ( इ. स. २००१

( किंमत १२५ रु.)

: प्रकाशक :

**आचार्य श्री जगन्नाथ महाराज**

श्री सतपंथ साहित्य प्रकाशन

श्री सतपंथी मंदीर, फैजपूर ( ४२५ ५०३ )

ता. यावल, जि. जळगाव

फोन ( ०२५८५ ) ४५४१७

मुद्रक : श्री ऑफसेट फैजपूर, ता. यावल, जि. जळगाव ( फोन ४५३५१ )

# श्री निष्कलंकी नारायण गायत्री मंत्र व यंत्र




ॐ नमो निष्कलंकी नारायणजनार्दनाय। भस्मायुधाय विद्महे।
दिव्यनेत्राय धीमहि। तन्नोज्वरहर: प्रचोदयात्। तन्नोज्वरहर: प्रचोदयात्॥
ॐ शांति: ! शांति: !! शांति: !!!

भगवान श्री निष्कलंकी नारायणाच्या उपासनेकरिता हा गायत्रीमंत्र व हे यंत्र आहे. दिव्यदृष्टीदायी व सद्बुध्दि प्रकाशक निष्कलंकी नारायण भगवंता तुझे अकल्पित स्वरूप केवळ आत्मज्ञान प्रकाशानेच जाणता येते. तू आमच्या भवदु:खांना भस्मीभूत करुन आमच्या चित्तात दिव्य ज्ञानोदय होऊ दे. आमच्या त्रिविधतापांची शांति कर ही प्रार्थना.



**कलशोद्भव नारायण स्वरूप**

वैदिक सनातन सतपंथ घटपाट कलशपूजा यज्ञविधीत आद्यनारायण, आद्यशक्ति, ब्रह्मा, विष्णु, महेश्वर या मुख्य पंचायतनाची पूजा केली जाते.



कलशस्थित विश्वब्रह्मांड स्वरूप.

वैदिक सनातन सतपंथ तत्वानुसार विश्वब्रह्मांडस्थित सर्व देवदैवतांची पूजा कलशपूजेच्या माध्यमातून केली जाते.



**सद्गुरू श्री इमामशाह महाराज**

वैदिक सनातन सतपंथ प्रवर्तक सद्गुरू श्री इमामशाह महाराज यांची संपूर्ण विश्वातील एकमेव स्वयंभू मूर्ति श्री सतपंथी मंदीर फैजपूर येथील संतकृपाआश्रमात स्थानापन्न झाली.



सद्‌गुरू इमामशाह महाराजांचे समाधीस्थान

वैदिक सनातन सतपंथ प्रवर्तक सद्‌गुरू श्री इमामशाह महाराज यांचे समाधीस्थान व
अखंड ज्योतिस्वरूपाचे दर्शन




**श्रीमद् दश अवतार**

**सनातन सतपंथ धर्माचे पूजनिय दैवत.**




श्री निष्कलंकी नारायण

सनातन सतपंथ धर्माचे उपास्य दैवत.



आचार्य श्री करसनदासजी महाराज.

प.पू वीरवर देवर्षि राष्ट्रीय संत आचार्य श्री करसनदासजी महाराज, प्रेरणा पीठ पीराणा.

॥ ॐ ॥

॥ श्री सतगुरु प्रसन्न ॥

# प्रस्तावना

परमकृपळू भगवंताच्या अपार स्नेहसागरात झोके घेणाऱ्या नौकेस सावरणारे व सतपंथाची नौका यथास्थित पार लावून देणारे सद्गुरू श्री इमामशाह महाराज पंधराव्या शतकात होऊन गेले. त्यांनी वैदिक सनातन धर्माचा सांगोपांग अभ्यास करून जे सन्मार्गाचे दिग्दर्शन केले व आचरण केले. संपूर्ण जगतात ते एकमेव उदाहरण आहे. प्राचीन ऋषिमुनिंची धुरा आपल्या सद्भक्तांनी वाहावी याकरितां त्यांनी आपल्या शिष्यास ऋषिवर, मुनिवर, भाई या नावानेच संबोधले आहे. त्यांच्या मते ऋषिवर तो मनुष्य होऊ शकेल जो ज्ञानदृष्टीने युक्त आहे, जो संसारी आहे संसारात प्रौढपणाची भुमिका घेऊन वागणारा तो ऋषिवर. मुनिवर म्हणजे संसारात राहून जीवन्मुक्त पणाने वागणारा. तेवढ्याकरिता त्यांनी ऋषिवर चेतावणी व मुनिवर चेतावणी नावाचे दोन स्वतंत्र ग्रंथ रचलेले आहेत. जिवनात ऋषिवर झाल्याखेरीज मुनिवर होताच येत नाही. मनुष्य जीवनाचा सद्गुरु इमामशाह महाराजांनी खूप गहन अभ्यास केलेला आहे.

प्रत्येक पंथात जीवनात आचार विचार सुधारण्यासाठी उपासना आणि कर्मकांड यांचा आधार घेतलेला आहे. सतपंथातही इमामशाहांचे उच्च तत्वज्ञान समजाविण्याकरितां कांही विशिष्ट प्रकारचा कर्मकांडविधी सांगण्यात आला आहे. सतपंथी लोक वेदप्रणित वर्णाश्रमधर्म पाळतात. चतुर्वेद, उपनिषद व दशावतार प्रमाण मानतात. ब्रह्मा, विष्णु, महेश्वर आद्यशक्ति व आद्यनारायण ह्या ईष्ट देवता आहेत. कलशपाट व अखंड ज्योत यांची ते पूजा करतात तद्वारे परमात्म्याची आराधना करतात.

प्रथम पूजास्थान उदधूप-उदबत्ती वगैरे सुगंधी पदार्थाच्या योगाने शुध्द व पवित्र करतात. पूजा यज्ञविधीच्या वेळी शुध्द तूपाच्या तीन ज्योति लावतात. त्रिगुणात्मक देवतांचे प्रतिक म्हणून या ज्योतींची स्थापना होते. दुसऱ्या समईत आद्यनारायण व आद्यशक्ति या दोन ज्योतींची स्थापना करतात. या मुख्य पाच ज्योति वेगवेगळ्या दोन समईत लावाव्या. सिंहासन व घटपाटाची स्थापना मंत्रोपचाराने करतात. प्रत्येक पूजाविधीच्या क्रियेच्या वेळी त्यानुसार मंत्र म्हटले जातात. कलश हे ईश्वराचे प्रतिक असून केशर कस्तुरी, फूल, अक्षता, चंदन, अत्तर वगैरे सुगंधी द्रव्याने त्याची यथाविधी पूजा केली जाते. त्यात मंत्रोपचाराने शुध्द जल भरून अक्षता वगैरे टाकून व गुरुचरणामृत पाऊळगोळी ह्यांच्या साहाय्याने तीर्थ (अमीरस - अमृत) तयार केले जाते. या कलशाच्या ठिकाणी कलशातील तिर्थ जलाने सर्व देवदेवतांना मंत्रोपचाराने आणि त्या देवदेवतांच्या नामोच्चाराने नमन करून आवाहन केले जाते म्हणजे कलशातील तीर्थ सर्व देव देवतांच्या अधिष्टानाने युक्त होते. शुध्द तूप, साखर, रवा, दुध, तांदूळ, गुळ, सुकामेवा पचमेवा मिठाई व फळे यांच्या साहाय्याने केलेल्या प्रसादाचे पाचभाग करून प्रथम भगवान विष्णुच्या नैवेद्याचा नंतर अनुक्रमे ब्रह्मा, विष्णु,

महेश, आद्यशक्ति आणि अक्षयपात्र-अन्नपूर्णाचा या देवतांच्या नैवेद्यांचे मंत्र होतात. सर्वसाधारणपणे नेहमीच्या नित्यपूजेचा असा पूजाविधी असतो. तीर्थप्रसादाच्या सेवनाने मनुष्याच्या त्रिविधतापांची निवृत्ति होऊन मानवी जीवन सुखी-समाधानाने युक्त होते असा सर्वसाधारण नियम आहे. मानवी जीवनाचा काही ठळक घटनांचा या पूजाविधीत समावेश आहे.

स्थूल मानाने पाहता सतपंथ घटपाट पूजाविधीत तीन प्रमुख कर्मकांडाचा समावेश होतो.

१) नित्य, २) नैमित्तिक, ३) काम्य.

१) **नित्यकर्म**:- नित्यकर्मात नियमीत सकाळी ४ वाजता मंदिरात शुध्द तूपाची ज्योत लावून मंत्रोपचाराने उदधूप सर्व दूर फिरवून वातावरण निर्मल शुध्द व पवित्र केले जाते. ज्योतीला, कलशाला सद्‌गुरु चरणपादुकांना व वेदोपनिषदादि पवित्र धर्मग्रंथांना उदधूप करून पुष्प, फुलहार अत्तरचंदन वगैरे उपायांनी पूजन करून वंदन केले जाते, नगारा, दुंदुभी व घंटानाद करून दशावतार व सद्‌गुरुंची आरती केली जाते. नंतर गुरूमंत्रजप व ध्यान केले जाते. दररोज सकाळी पूजा होत असेल तर फारच चांगले. कारण संध्याकाळच्या पूजेप्रमाणे सकाळची पूजा विशेष श्रेष्ठ आहे. मनाची एकाग्रता सकाळच्या वेळी विशेष साधता येते. नंतर सद्‌गरु चरणामृत व पूजा असल्यास प्रसाद घ्यावा. कार्तिक महिन्यात काकड आरती केली जाते. ही झाली सतपंथी मंदीरातील प्रथा.

घरोघरी नित्यविधी म्हणून सतपंथ संप्रदायाचे लोक तूपाची ज्योत लावून सद्‌गुरुमहाराजांच्या व निष्कलंकी नारायण आणि दशअवतारांच्या फोटोला उदधूपाने ओवाळून फुले अथवा फुलहार चढवून पूजन करून मंत्र जप करतात. कित्येक लोक नित्यपाठ, सद्‌गुरु इमामशाह महाराजांच्या चरित्र ग्रंथाचे वा दशावताराचे १/१ किंवा २/२ पानाचे वाचन करतात. नंतर आरती करतात.

दुपारच्या वेळी जेवण करतांना अन्न ब्रह्मार्पण करण्याचा मंत्र म्हणून जेवण करतात. ज्या भगवंताच्या कृपेने हे अन्न मिळाले व ज्याच्याने आपले धारण पोषण होते ते अन्न ब्रह्मरुप आहे. म्हणून ईश्वरस्वरूप अशा अन्नास नमस्कार करून भगवंताचे नामस्मरण चिंतन ध्यान करीत करीत ते ग्रहण करावे.

संध्याकाळी मंदिरात तूपाची ज्योत लावून उदधूप फिरवून नगारा, दुंदुभी व घंटानाद करून दशावताराची आरती व गुरुदेवाची आरती म्हणतात. नंतर ध्यान किंवा मंत्रजप करतात. प्रत्येक गुरुवारी किंवा दररोज रात्री पूजा अथवा भजन सत्संग करतात. घरोघरी लोक ज्योत लावून उदबत्ती ओवाळून आरती म्हणतात. रोज मध्यरात्री मनोमन ईश्वराचे ध्यान स्मरण, चिंतन व नामस्मरण करतात. अशा प्रकारे सत्पंथ संप्रदायात या चार वेळेच्या संध्या नित्यकर्मात गणल्या जातात. सत्पंथ संप्रदायाच्या नियमाप्रमाणे सत्पंथाची दीक्षा घेतल्यानंतर कांकण बांधल्यानंतर लौकिक दृष्ट्या तो सत्पंथ संप्रदायाचा गणला जातो. पण जो चार संध्या करून भजन पूजन सत्संग करतो तोच खरा सतपंथी गणला जातो.

२) **नैमित्तिक कर्म:**

१) जन्मानिमित्ताने, २) मंत्रदीक्षाग्रहण, ३) लग्नानिमित्ताने, ४) व्रतोपवासानिमित्ताने, ५) दूध, दही, शुध्दी निमित्ताने, ६) उत्तरकार्य – मृतसंस्कार – पींडदान श्राध्दानिमित्ताने.

१) **जन्मनिमित्ताने:-** (लाई सुतक) जननाशौच. स्त्री व पुरुष यांनी संतानाच्या जन्मानंतर सव्वा महिन्याने देवदर्शन करण्याचा हा विधी असतो. जननाशौच म्हणून गोत्रजांनी ११ दिवसापर्यंत वृध्दि पाळावी. संतानाच्या माता-पित्याने ४० दिवसपर्यंत जननाशौच पाळावे. त्यांनतर स्नानादिने शुचिर्भूत होऊन मंदीरात येऊन विधीयुक्त पूजा करावी. जन्मलेले मुल व त्याचे आईवडिल यांना मंत्रोपचाराने तीर्थ प्रायश्चित घेऊन पवित्र केले जाते. नामकरण विधी हा सामाजिक पध्दतीने केला जातो. ह्याच्यासाठी मंदिरात विधि करण्याची जरूर नाही. मूळ नक्षत्रांवर जन्मलेल्या मुलांच्या शांतिसाठी मंदीरात पूजाविधी केला जातो. त्याला जन्मशांति अथवा मूळशांति म्हणतात. जन्मनक्षत्र, जन्मयोग सदोष असल्यास त्या बालकाला त्रास होतो म्हणून त्या बालकाच्या नावाने स्वतंत्र पूजा विधी करून तो दोष घालविता येतो. त्यास नवग्रहशांतिच्या पूजेची आवश्यकता असते.

२) **मंत्रदीक्षाग्रहण:-** मुलगा समजंस झाल्यावर म्हणजे ८ वर्षाचा झाल्यावर त्यास पूजाविधीने युक्त गुरुमंत्र दीक्षा दिली जाते. त्यास काकण बांधणे असे ही म्हणतात. त्या निमित्ताने पूजाविधी करून तीर्थजलाने युक्त सुगंधीफूल (चाफा, मोगरा किंवा निशिगंध आदि पांढरे शुभ्रफुल) दीक्षा घेणाऱ्याच्या हात जोडलेल्या मनगटावरून फिरवितात. त्यास मंत्रोपचाराने शुध्द व पवित्र करून गुरुमंत्र दिला जातो. गुरुमंत्र सहसा आचार्याकडूनच घ्यायचा असतो. जेथे आचार्य नसतात तेथे सुविद्य मुखीकडून गुरुमंत्र प्रगट करतात. त्याच तारकमंत्राचे आमरण स्मरण करायचे असते. हा विधी झाल्यापासून ती व्यक्ति सतपंथाची अनुयायी गणली जाते. मुलीच्या बाबतीत दीक्षाग्रहण ऐच्छीक आहे. विवाहसमयी त्यांना प्रगोत्रात जावे लागते. विवाहानंतर वा विवाहाआधीहि कित्येक मुली काकण बांधतात. सतपंथाचा अनुग्रह सहसा वंश परंपरागत चालतो.

३) **लग्ना निमित्ताने:** संपूर्ण लग्नकार्यविधी वैदिक सनातन पध्दती प्रमाणे ब्राह्मणाकडूनच केला जातो. पण सतपंथाच्या नियमाप्रमाणे वराने अथवा वधूने उपवर कन्येने विवाहाच्या आधी पूजाविधी करवून त्यात हळद कुंकू मंत्रवून घ्यावे. त्याला देवब्राह्मण किंवा हळदीचा देव असे म्हणतात. वराने अथवा वधूने गुरुमंत्र दीक्षा घेतल्याशिवाय हा पूजाविधी करता येत नाही. लग्नाच्या वेळी ते मंत्रविलेले हळदकुंकू वराला अथवा वधूला लावतात. लग्नानंतर घरात आणलेल्या नविन वधुला पूजाविधी करून मंत्रदिक्षा दिली जाते. विधवेशी पुनर्विवाह केलेल्या स्त्रीपुरुषाचा गांधर्वविवाह झाल्यानंतर एक स्वतंत्र विधी केला जातो. त्याला गुन्हा उतारणे म्हणतात. गांधर्व हा सामाजिक रुढी परंपरेनुसार दोष मानला जातो. कारण वैदिक विवाहविधीनुसार परगोत्रात गेलेल्या पण पतिनिधनाने अथवा सोडचिठ्ठी करून पित्याच्या घरी आलेल्या मुलींचा पुन्हा नविन गोत्रातील वराशी संबंध येतो तो

सामाजिक दोष टाळण्यासाठी हा पूजाविधी केला जातो. तेव्हा मुखीने सांगावे की ही स्त्री आजपासून अमूक गोत्राची गणली जाईल. हिन्दुधर्माप्रमाणे स्त्रीयांना पुनर्लग्न करण्याचा अधिकार नव्हता, पण सामाजिक हीताकरितां स्त्रीयांनी पुनर्लग्न केले तर त्यांनी प्रायश्चित्त घेण्यांकरिता हा विधी करावयाचा असतो.

४) व्रतानिमित्ताने :-

प्रत्येक महिन्याच्या शुध्द बीजेला चन्द्रदर्शनाच्या दिवशी निरंकार उपवास करून संध्याकाळी चंद्रदर्शन घेऊन उपवासाचे पारणे करावे. त्या निमित्ताने मंदीरात समुहपूजा होते. थाऊरबीज म्हणजे अजवाळी बीज. ज्यावेळी बुधवारी पूर्ण अमावशा, गुरुवारी पूर्ण प्रतिपदा व शुक्रवारी पूर्णबीज असून चन्द्रदर्शन असेल तेव्हा गुरूवार व शुक्रवार या दोन दिवसांचा म्हणजे १२ प्रहराचा उपवास निरंकार केला जातो. शुक्रवारी संध्याकाळी चन्द्राचे दर्शन करून समूहपूजाविधी केला जातो व उपवासाचे पारणे करतात. घरी उपवास करायचा असल्यास गुरुवार सकाळपासून संध्याकाळपर्यंत उपवास करावा मात्र गुरुवारी संध्याकाळी जेवण करू नये प्रसाद भात व दुध गुळ यावर उपवास सोडावा नंतर तेव्हापासून शुक्रवार संध्याकाळपर्यंत असा १२ प्रहराचा उपवास करावा. संध्याकाळी सुपाच्य भोजन करून उपवास सोडावा.

सतपंथाच्या मान्यतेनुसार कलियुगाचे फार महत्वाचे असे हे व्रत आहे. याला युगतिथी ही म्हणतात. ज्याप्रमाणे सत्ययुगात गुरुवारची एकादशी, त्रेतायुगात रविवारची चतुर्दशी व द्वापार युगात सोमवती अमावस्या तसेच कलियुगात ही अजवाळी बीज महत्वाची युगतिथी म्हणून मानली जाते. या तिथ्यांना युगतिथी मानण्याचे कारण असे की त्यादिवशी त्या युगाला सुरुवात झालेली असते. हे सारे वर्णन आपल्याला ''मूळस्तंभ'' या ग्रंथात वाचायला मिळते. तसेच सतपंथाच्या ''मूळबंध'' ग्रंथातील 'युगसृष्टीनु मंडाण' या भागात सुध्दा आलेले आहे.

याशिवाय गुढीपाडवा, अक्षयतृतीया, गुरुपौर्णिमा, रामनवमी, गोकुळअष्टमी, पोळा, विजयादशमी, एकादशी, श्राध्दपक्ष, गुरुवार इ. व्रते सत्पंथी लोक करतात. व्रत वैशिष्ट्याप्रमाणे त्या दिवशी मंदीरात पूजा अर्चा, भजन, पूजन, सत्संग वगैरे कार्यक्रम होतात.

५) दूध दही शुध्दि निमित्ताने :-

गाय अथवा म्हैस व्यायल्यानंतर बाराव्या दिवशी दूध, दही व तूप मंदिरात आणून पूजाविधी करून त्यात मंत्रोपचाराने ते शुध्द व पवित्र केले जाते व तूपाची ज्योत लावतात त्यास आरती लावणे असेही म्हणतात. नंतर ते दूध विकण्यास अथवा पूजेकरिता वापरण्यास उपयुक्त होते.

६) उत्तरकार्य निमित्ताने :-

प्रेत संस्कार :-

सतपंथी अनुयायांच्या मृत देहास भूमिदागच देण्याचा नियम प्रथा आहे. अथवा रुढी आहे. देश, काल, परिस्थिती आणि निमित्त विशेषत्वाने क्वचित प्रसंगी अग्नी संस्कारही करण्यात येतो. कोणत्याही अंत्यसंस्काराच्या वेळी मंत्रोपचार अथवा पूजा विधी नसतो. सामाजिक रुढी परंपरेनुसार संस्कार करण्यात येतात. भूमिदाग देतांना साधारणत: दक्षिणोत्तर ६ ते ७ फूटाचा खोल, २ फूट रुंद ७ फूट लांब असा खड्डा खोदून प्रेतास धुवून पुसून स्वच्छ करून उत्तरेकडे शिर व पश्चिमेस मुख करून मूठमाती देतात. तिसऱ्या दिवशी म्हणजे २४ प्रहरानंतर सामाजिक प्रथेनुसार खांदे उतरविल्यानंतर दररोज रात्री मृतजिवात्म्याच्या नावाने पूजाविधी करून थाळ भरतात. दहाव्या दिवशी म्हणजे ८० प्रहरानंतर सामाजिक प्रथेनुसार ब्राह्मणाकडून पिंड पाडले जातात व त्या दिवसापर्यंत थाळ भरतात. २४ प्रहर पर्यंत मृतात्मा आपल्या देहाभोवती अथवा घराभोवती घोटाळतो. म्हणून अन्नदान करून त्याला तृप्त करतात, २४ प्रहरापासून ८० प्रहरापर्यंत त्याचा यमपुरीचा प्रवास असतो म्हणून थाळ भरून त्याला तृप्त करतात. त्या नंतर मृतात्म्याच्या कर्माचा निर्वाळा व न्यायदान असते म्हणजे पुढची गति त्याला प्राप्तहोते असा समज आहे. म्हणून हे सर्व विधी करणे आवश्यक आहे. थाळ भरणे ज्याला शक्य नसते ते लोक ११ दिवसपर्यंत मंदिरात मृतात्म्याच्या नावाने शुध्द तूपाची अखंड ज्योत लावतात. ११ व्या दिवशी गंध मोकळा होतो म्हणजे सुतक नाहिसे होते.

उटासन विधी :-

११ व्या दिवसापासून पुढे केव्हाही त्या मृतात्म्याच्या शांतिसाठी व मुक्तिसाठी उटासन (उच्चासन) विधी करण्यात येतो. त्यावेळी त्या जीवात्म्याच्या नावाने घटपाट पूजा यज्ञविधी द्वारा पींड पाडतात. म्हणून त्यास पिंड दान सुध्दा म्हणतात. त्याचा विधी थोडक्यात असा आहे कीं, मृतात्म्याच्या वंशातील अथवा गोत्रातील कोणीही सतपंथाचा अनुग्रह घेतलेली व्यक्ति मृतात्म्याच्या नावाने पींड सारतात. प्रथम नेहमीची पंचनैवेद्यसमर्पणाची साधी पूजा झाल्यानंतर यमदूताना नमस्काराचे व आवाहनाचे मंत्र होतात. नंतर पंचमहाभूत, पंचज्ञानेन्द्रिये, पंच कर्मेन्द्रिये, पंच प्राण, सत्व, रज, तम, मन, अहंकार, महत्तत्व प्रकृति आणि पुरुष या २८ तत्वामधून त्या जीवात्म्याला मुक्त करण्याकरिता २८ पींड (रवा, साखर, तूप दुधाने युक्त प्रसादाचे पींड) तयार करून त्यावर मंत्रोच्चार होतो. नंतर तीन पींडावर त्या जीवात्म्याचे त्रिविध ताप निवारण्यासाठी लाई सुतक उतरण्याचे मंत्र होतात. नंतर सात देवदूतांना नमस्कार व आवाहनाचे मंत्र होतात. क्रमाने पुढे हरिवंशाचा मंत्र होऊन एका मोठ्या पिंडावर स्वेदज, अंडज, उद्भीज, जारज या चारही खाणीचे मंत्र होऊन त्या जिवात्म्याच्या जीवनात काही दोषयुक्त, पापयुक्त, नियमबाह्य कर्मे घडलेली असतील त्या दोषातून कर्मबंधनातून मुक्त

होण्यासाठी अपराध क्षमा करण्याचे मंत्र होतात. नंतर ५२ घाटीचे मंत्र होतात. नंतर मृतात्म्याच्या नावाने सुक्रित म्हणजे दानपुण्य, दसवंत वगैरेचे मंत्र होतात. नंतर मृतात्म्याच्या नावाने पींडदान, गोदान, वस्त्रदान, पात्रदान, काठीकांबळ, छत्री पाद्रदाण दान, मेवामिष्ठान्न अन्नदान, सुगंधी द्रव्यदान, महेलमाडी, शेतीवाडी, वृक्षदान वगैरे दानाचे मंत्र होतात. हे दानकर्म ऐच्छिक असते. तो ज्याचे त्याचे आर्थिक परिस्थितीचा व श्रध्देचा भाग आहे. पुढे त्या जीवात्म्याला मृत्यूलोकांतून उठवून सूर्यमंडळ, चंद्रमंडळ, नक्षत्रमंडळ, वायुमंडळ, ध्रुवमंडळ यांच्यावर चढवून महर्लोक, जनलोक, तपोलोक व तेथून तेजोलोक म्हणजे अमरपदात अथवा ब्रह्मलोकात पोहोचविण्याचे मंत्र होतात. नंतर त्या जीवात्म्याच्या सूक्ष्म इच्छा वासना, कामना तृप्त होण्याकरीता व त्यास सौख्य, शांति परमगति लाभण्याकरितां भगवंताच्या आराधनेचे मंत्र असतात. या संपूर्ण विधीच्या योगाने मृतात्म्यास शांतिलाभ होतो. त्याच्या इच्छा कामना, वासना, तृप्त होतात व तो मुक्त होतो अथवा त्यास सद्गती लाभते. या कार्यात शुध्दता, पावित्र्य व मनोबल अत्यंत उपयुक्त आहे.

श्राध्दविधी :-

दरवर्षी मृतात्म्याच्या पुण्यतिथीनिमित्ताने वंशजांना त्यांचे स्मरण म्हणून पूजाविधी करतात. त्यास वर्षश्राध्द सुध्दा म्हणतात. कित्येक लोकांचे असे म्हणणे असते कीं ज्या जीवात्म्याचे उत्तरकार्य झालेले असते त्याचे श्राध्द व पुण्यतिथी करू नये, कारण मुक्त झालेल्या जिवात्म्यास परत या सांसारीक उपाधीत टाकू नये. पण श्राध्द व पुण्यतिथीच्या विधीत तसा काहीहि संबंध नसतो. ते केवळ पितृस्मरण म्हणून घरातील लहानमोठ्या जिवात्म्यांना आपल्या पूर्वजांचे स्मरण राहावे म्हणून तो विधी करावयाचा असतो. तसे जर केले नाही तर गृहस्थजीवनात पितृयज्ञ म्हणून पंचमहायज्ञातील एक यज्ञीय कर्म न केल्याचा दोष लागेल व उत्तम प्रकारचा गृहस्थाश्रम आचरण्याचे श्रेय लाभणार नाही व पितृबाधेचे दु:ख होण्याचा संभव असतो म्हणून श्राध्द अवश्य करावे.

३) काम्यकर्म :- ( सकाम कर्म )

१) मानीत पूजा, २) दसवंत सुक्रीत, ३) व्याधिपीडानिवारण्यार्थ, ४) वास्तुशांति पूजा,
५) यज्ञयाग होम.

१) मानीत पूजा :- कोणत्याही इच्छेच्या पूर्तिसाठी, उद्योगधंदा, व्यापार, व्यवसाय, शेती, व्याधिनिवारण इ. साठी मानताबाधा मानून केलेला पूजाविधी.

२) दसवंत सुक्रीत :- ही पूजा नविन आलेल्या उत्पन्नाचा दहावा भाग मंदिरात दानधर्म म्हणून अर्पण करुन त्यानिमित्ताने ब्रह्मार्पण म्हणून पूजाविधी केला जातो. पगारदार नोकर माणसाने वर्षातून एक महिन्याचा पगार अगर तत्सम रकम अर्पण करावी.

३) **व्याधिपीडा निवारणार्थ, (सौख्य, शांति प्रित्यर्थ):- नवग्रह शांति:-** कोणत्याही प्रकारची व्याधी अथवा दुःख निवारण करण्यासाठी जी पूजा केली जाते, तिला नवग्रहशांतिची पूजा म्हणतात. हीच पूजा एखाद्या वास्तूत काही दोष असल्यास अथवा शेतातील विहीरी वगैरे सदोष असल्यास तो दोष निवारणार्थ व शांति प्रित्यर्थ ही पूजा करतात.

४) **वास्तुशांति पूजा:-** वास्तूशांतीच्या वेळी होमाकरितां विटांचे हवनकुंड करतात. लहानशा एका बैकात वास्तु पुरुष व नागमूर्ति, नागफणी खिळे व घोड्याची नाल आणतात. समीधाकाड्या, गोवरी, गाईचे तूप, हवनद्रव्य आणतात. हवनकुंडास चौफेर चार त्रिकोणी लाल झेंडे आणतात. एका स्वतंत्र चौरंगावर लाल फडक्यावर नवग्रहांची स्थापना, कलशस्थापना, व सत्यनारायणाची स्थापना करतात. दोन समईत एका समईत २ ज्योति, दुसरीत ३ ज्योति लावतात. कलश घटपाटाची पूजा साधी पूजा आटोपल्यानंतर नवग्रहांची पूजा करायला लावतात. नंतर होमकुंडात सुहासिन स्त्रिकडून अग्नि आणतात तो टाकून यज्ञकुंड प्रदिप्त केले जाते. त्यात श्रीनिष्कलंकी नारायण गायत्री मंत्राच्या १०८ आहुति देतात. शेवटी हिरव्या खणात गुंडाळलेल्या नारळाची आहूती देतात. शंखपालाचा नैवेद्य पोचवितात. घराला कुंकवाचे टिळे लावतात. वास्तूमूर्ति, व नाग असलेले बैकू ईशान्य दिशेकडे जमिनीत गाडतात. अशा प्रकारचा जो विधी होतो तो वास्तूशांतिचा विधी असतो. तो दुपारच्या प्रहरीच करायचा असतो.

५) **यज्ञयाग होम हवन:-** हा विधी सत्पंथांत अभिप्रेत नाही. तो ब्राह्मण्यविधी आहे. पण गणेश, कलश भगवंताची षोडशोपचारे पूजा असल्याने त्याचे मंत्र दिलेले आहेत. कोणाला संस्कृतमधून पूजा करण्याची आवड असते. त्यांच्याकरीता हे नियमीत पूजा मंत्र दिलेले आहेत.

अशा प्रकारचा कर्मकांड पूजाविधीचा प्रादुर्भाव सतपंथात विशेषत्वाने आहे. ही सर्व पूजाविधी अथर्ववेदाच्या आधाराने रचलेली कर्मकांडविधी आहे. अथर्ववेदाच्या एखाद्या विशिष्ट भागाचा हा अनुवाद नाही किंवा विशिष्ट देवतेच्या प्रसन्नतेकरितांच केवळ त्या देवतेची पूजा सतपंथ मंत्रात अभिप्रेत नाही. सद्गुरु इमामशाह महाराजांनी ही जी कलश पूजा दिग्दर्शित केली आहे. त्यात विश्वचक्रचालक सर्वच देवी देवतांचा नमस्कार, आवाहन, पूजन, व नैवेद्य ग्रहण आणि आशिर्वचनाचा भाग येत असल्याने सर्वधर्म सन्मन्वय यात गुंफलेला आहे. अथर्ववेदामध्ये दिव्यशक्ति भरलेली आहे. जो त्याची सांगोपांग विस्तृत चर्चा करेल त्यासच हे समजून येईल. अथर्ववेदाचे उपनिषद आपणास दीव्यदृष्टी देऊन भगवंताचा स्वरूप साक्षात्कार घडवून देतात. मी परमेश्वराचा पुत्र आहे आणि वाटेल ते काम करू शकेल, अशी आत्मश्रध्दा आणि हिंमत हवी आहे. असे झाले तर परब्रह्म परमात्म्याच्या दिव्य शक्तिचा अंश आपल्यात उतरल्याशिवाय राहणार नाही आणि हा अंशच महान आहे. ज्याप्रमाणे कोरड्या गवतावर विस्तवाची एखादी ठिणगी जरी पडली तरी दावानल प्रगट होतो त्याप्रमाणे मंत्रशक्ति अग्नीच्या एका स्फुल्लींगा प्रमाणे आहे. सतपंथ सनातन धर्माच्या मंत्रामध्ये या शक्तिचा पुरेपूर उपयोग केलेला आहे. पाहिजे फक्त आपला आत्मविश्वास, असो.

प्राचीन पूजेच्या वाङ्मयात जे मंत्र दिलेले आहेत. त्यात आणि आताच्या मंत्रात थोडा फरक जाणवतो. कित्येक लोकांची समज होती की पूर्वीच्या मंत्रात असलेल्या अरबी शब्दामुळे मंत्रांचा विशेष परिणाम होत होता. विशेषत: अरबी भाषा अथवा अरबीशब्द यांचा मंत्रशक्तित प्रभाव पडला असता तर ते इस्लामी संस्कृतिचे मंत्र गणले गेले असते. अरबी संस्कृतित ॐ, ज्योत, कलशपूजा व दशावतार अभिप्रेत नाही. त्यामुळे अरबी संस्कृतीचा प्रभाव सनातन हिन्दुधर्माच्या वैदिक वाङ्मयात अभिप्रेत नाही. सद्गुरु श्री इमामशाह महाराजांनी जी पूजा कर्मकांड दिग्दर्शित केले ते वैदिक मार्गातील कर्मकांड आहे. ते अथर्ववेदावर आधारलेले आहे व अरबी संस्कृति वेदाला मानित नाही म्हणून सत्पंथात प्राचिन वाङ्मयात असलेले शब्द इमामशाहांचे नाहीत. ते बाहेरून आलेल्या कचऱ्यात जमा करून सतपंथीयांना निर्विवाद कर्मकांड दिग्दर्शित करण्याचा हा प्रयत्न आहे. कर्मकांडाप्रमाणेच ज्ञानमार्ग, उपासना, भक्तिमार्गाचे दिग्दर्शन करण्याचा हा प्रयत्न आहे.

इ.स. १९५४ मध्ये प्रसिध्द झालेल्या व मुखी काशिराम नारणदास यांनी प्रसिध्द केलेल्या "सतपंथ पूजा दर्शन - घटपाट विधी" या नावाच्या ग्रंथात पूजेचा क्रम असा घेतलेला आहे की साधीपूजा आटोपल्यावर कलश उत्थापन, प्रसाद वितरण, व सकळसंघ उठवीण्याचा विधी झाल्यानंतर जीवाचा अपराध उतरविण्याचा, बालक तथा नविन धर्मियास काकण बांधण्याचा मंत्र, वरकन्येस काकण बांधण्याचे मंत्र, चार खाणीचे ४, अपराध सोडविण्याचे मंत्र ५, रविमंडळाचे २, मंत्र झाल्यानंतर बावन घाटीचा, आसनवस्त्राचे २, आसनावर छाट देण्याचा व उटासनात देव थाळीचा मंत्र असा क्रम घेतलेला आहे. यास अथर्ववेदाच्या मंत्रांचा आधार दिलेला नाही.

इ.स. १९५४ मध्येच 'सतपंथ शास्त्र, मोक्षगतीनो साचोमार्ग' लेखक :- सैयद कासिमअली दुरवेशअली अेराकी, अलहुसेनी पीराणा प्रकाशक :- पटेल लालजीभाई नानजीभाई गढकम्पावाला, गुजराथ. या ग्रंथात साधी पूजा संपल्यावर जीवने माण लेवानी, गुन्हा उतारवानो १, गुन्हा उतारवानो मंत्र २ ते ६, चारखाणीचे मंत्र ४, रविमंडळ पहोचाडवानो मंत्र २, बावनघाटीनो मंत्र (बावनघाटीचे नाव नाही), आसनवस्त्रनो, वासणे छाट नाखवानो मंत्र देवथाळनो, बाळक तथा नवाधर्मीने काकणनो मंत्र, वर कन्याने काकण बांधवानो, अक्षता उतारवानो, प्रसाद लेवानो मंत्र असा क्रम दिलेला आहे.

इ.स. १९७४ मध्ये 'सतपंथ पूजा यज्ञविधी, घटपाट विधी' प्रकाशक :- सुरत जिल्हा सतपंथ मंडळ, बोडामुखीनु मंदीर, बेगमपुरा यांनी प्रकाशित केलेल्या पुस्तकात साधी पुजा आटोपल्यावर प्रसादाचा व सकलसंघ उठवानो मंत्र, नंतर बालक तथा नवाधर्मीने काकणनो, वरकन्याने काकण बांधवानो मंत्र झाल्यानंतर चार खाणनो ४, अपराध छोडाववानो ५, मंत्र नंतर रविमंडळाचे २ मंत्र, त्यानंतर बावन घाटीचे ३ मंत्र, आसना वासनाचे २ आसने छाट नाखवानो व देवथाळनो मंत्र या क्रमाने पूजाविधी केली जाते.

इ.स. १९८२ मध्ये ''पूजाविधी तथा ज्ञान'' प्रकाशक आचार्य काकासाहेब सवजी रामजी यांनी प्रसिध्द केलेल्या पुस्तकात साधीपूजा, हेजंदाच्या मंत्रानंतर विष्णु, ब्रह्मा, महेश, शक्तिच्या मंत्रानंतर सर्वदेव ऋषिवर दसोंद, माण लीधानो गुना उतारवानो मं. १ ते ६, गुन्हा छोडाववानो चार खाणनो मं. १ ते ४, रविमंडळ पहोचाडवानो मंत्र, जीवने उटासणानो, बावन घाटनो ३, आसनवस्त्रनो, देवथाळनो, बालक तथा नवाधर्मिने काकण बांधवानो, वरकन्याने काकण बांधवाने कलश उपरथी अक्षता उतारवानो, जमात छाटनो, लाई सुतकनो, पावळपीवानो अक्षयपात्रनो निशानी जमवानो, तीर्थ प्रसादनो व सकळसंघ उठवानो मंत्र असा क्रम घेतलेला आहे.

इ.स. १९८३ मध्ये 'श्री सतपंथ घटपाट पूजा यज्ञविधी' या श्रीसतपंथ साहित्य प्रकाशन फैजपूर या संस्थेने प्रकाशित केलेल्या पुस्तकात साधीपूजा संपल्यानंतर, काकण बांधण्याचे मंत्र संपल्यानंतर तीर्थप्रसाद व सकळसंघ उठाडवानो मंत्र होतो नंतर पींडसारणीचा, हरिवंशाचा, चार खाणीचे ४, अपराध सोडविण्याचे ५ मंत्र होऊन, सुक्रीत म्ह. देवथाळचा मंत्र रविमंडळ व सप्तमंडळावर जीवात्म्यास पोहोचविण्याचा मंत्र, बावन घाटीचा नावाचा, दसवंत दानवस्तूचा, अमरापुरी पोहोचविण्याचा आसनवस्त्राचा २ नवग्रह स्तोत्र, निष्कलंकी नारायण स्तोत्र व महाविष्णु स्तोत्राचे मंत्र होतात.

इ.स. १९९० मध्ये 'श्रीसतपंथ घटपाट पूजा यज्ञविधी' संपादक, जगन्नाथ महाराज श्री सतपंथ साहित्य प्रकाशन फैजपूर यांनी गुजराथी भाषेतून व लिपीतून ग्रंथ प्रसिध्द केले. त्यांच्या क्रमवरील पुस्तकाप्रमाणेच आहे.

इ.स. १९९४ मध्ये 'अथर्ववेदीय सतपंथ यज्ञविधी' प्रकाशक, 'सतपंथ सेवा प्रकाशन समिती, सतपंथ प्रेरणा पीठ पीराणा' यांनी प्रकाशित केलेल्या पुस्तकात साधी पुजा आटोपल्यानंतर, अक्षयपात्र, अपराध क्षमा करवानो मंत्र १ ते ६, चारखाणीचे मंत्र ४, रविमंडळ पहोचाडवानो, सद्गती आपवानो, बावन घाट, नामनो मंत्र ३, आसनवस्त्रनो मंत्र २, जीवने उत्तरक्रियाना आसने छाट नाखवानो मंत्र, देवथाळनो मंत्र, नवजात शिशु तथा धर्मदीक्षार्थी ओने गुरुदीक्षा आपवानो, वरकन्याने आशिर्वादनो मंत्र, अक्षत उतारवानो चरणामृत पीवानो प्रसादलेवानो मंत्र, दशतरीहरिवंश गायत्री, चार वेदनी गायत्री, नवग्रह शांति स्तोत्र, निष्कलंकी नारायण स्तोत्र कवच, महाविष्णु स्तोत्र अशा प्रकारचा क्रम या पुस्तकात दिलेला आहे.

साधारणत: १९५४ ते १९९४ या काळात सतपंथ घटपाट पूजा यज्ञविधीचे ७ वेळा वेगवेगळ्या ठिकाणी प्रकाशन झाले. त्या सर्वात साधीपूजा सोडल्यानंतर बाकीच्या मंत्रात मागेपुढे क्रमाने मंत्र आलेले आहेत. सर्व पूजा यज्ञविधीत चार खाणीचा, अपराध सोडवविण्याचे मंत्र येतात आणि लगेच रविमंडल व जीवात्म्यास अमरापुर पोहोचविण्याचा मंत्र येतो, मग बावन घाटीचा व नावांचा मंत्र येतो. हा क्रम विश्वविराट स्वरूपाचे वर्णन जे इमामशाहांनी केलेले आहे ते व इतर ग्रंथात विश्वब्रह्मांडांची रचना जी केलेली आहे त्यानुसार चार खाणीचे व अपराध सोडविण्याचे मंत्र झाल्यानंतर बावन घाटीचे व नावांचे मंत्र घ्यावे नंतर सूर्यमंडळात जीवात्म्यास पोहोचविण्याचे मंत्र घ्यावे असे

आमचे मत आहे. तसे केल्यास क्रम बरोबर येतो असे आम्हास वाटते. या गोष्टीवर विचार करून कोणी आमच्या निदर्शनास आणून द्यावे. असे आमचे प्रामाणिक मत आहे. या गोष्टीचा सांगोपांग विचार जर सतपंथातील वरिष्ट व आचार्य लोकांनी केला तर अनुयायांना समज देण्याच्या दृष्टीने अधिक सुकर होईल.

'सतपंथ घटपाट पूजा यज्ञविधी' नावाच्या या ग्रंथात शेवटी संस्कृतमधून जे मंत्र घेतलेले आहे ते केवळ संस्कृतची आवड असणाऱ्या लोकासाठी घेतलेले आहे. ती एक नित्यपूजा आहे. नित्यपूजा ही श्रीनिष्कलंकी नारायण भगवंताच्या उपासना पध्दतीचा एक भाग आहे. त्या पूजेचे मंत्र सद्‌गुरु इमामशाह महाराजांच्या पूजेत अभिप्रेत नाही. पण केवळ ज्यांना निष्कलंकी नारायणाची उपासना करायची आहे ते हे संस्कृत मंत्र म्हणून सुध्दा उपासना करू शकतात. त्यात षोडशोपचारे पूजा करण्याचा संकेत आहे.

अथर्ववेदाच्या मंत्राचे मराठीतून भाषांतर झाले. सद्‌गुरु इमामशाह महाराजांच्या मंत्राशी ते एकरुप होतात अगर नाही हे पाहिले नंतर सद्‌गुरु महाराजांच्या मंत्राशी जे एकरुप झाले ते मंत्र लिहून त्याचा मराठीतून भावार्थ व स्पष्टिकरण तयार केले. हे सर्व करीत असता व मंदीरातील इतर कामे करता करता खूप वेळ गेला. हे सर्व लिखाण लिहून तयार झाले पण त्यास ग्रंथरूप देण्यास प्रसिध्दीकरण करण्यास लागणारा पैसा आणावा कोठून. हा मोठा यक्ष प्रश्न होता. श्री ऑफसेटची अजून मागचीच बाकी द्यायची होती. त्याच्या कानावर हा ग्रंथ प्रींट करण्याची वार्ता जरी गेली असती तरी त्यांनी येऊन सांगितले असते कीं तुम्ही ग्रंथ प्रकाशन करून घ्या पैसे येतील, जमतील तेव्हा द्या हेच उत्तर त्यांनी दिले असते आणि झालेही तसेच. जेव्हा आम्ही नुसते नाव काढले तेवढ्यात श्री सुरेश शेट आले व ग्रंथ पाहिला आणि सांगितले तुमच्याजवळ जसे पैसे येतील तेव्हा द्या असे म्हणून प्रिंटींगला सुरुवात केली.

आर्थिक प्रश्न कसा सोडवावा या विवंचेनेत असता मंदीरातील श्रीमती बेबीताईने सांगितले 'महाराज मला खावटी म्हणून माझ्या भावांनी दिलेले दहा हजार रु.मी या साहित्य प्रकाशनास देते.' झाले. सुरुवात झाली ज्या ज्या लोकांना माहिती पडले त्या त्या लोकांनी सतपंथ साहित्य प्रकाशनास मदत केली. ग्रंथाच्या शेवटी त्या त्या लोकांचे फोटो द्यावे असे मला वाटले. कारण त्या लोकांनी तशी अपेक्षा केलीच नव्हती पण मीच आग्रह करून त्यांचे फोटो प्रिंट करण्याचे ठरविले. ज्यांनी जीवनात येऊन अल्पसा वा भारीत भारी त्याग केला त्यांचा फोटो ग्रंथात दिल्यास नुकसान काय होते? ईश्वर जर मला शिक्षा करील तरी ती मी आनंदाने भोगेन. असो.

सदर ग्रंथ फैजपूर येथील 'श्री ऑफसेट प्रेस' चे मालक श्रीराम सुकलालसिंह परदेशी उर्फ नन्दुशेठ आणि बंधू यांनी जबाबदारी स्विकारून ताबडतोब नेटाने काम सुरु केले व श्री संजय वडगांवकर (कुळकर्णी टायपिंग सर) यांनी उत्तम प्रकारे टाईप कंपोजिंग केले. तसेच प्रेसच्या सर्व कर्मचाऱ्यांनी जिद्दीने ग्रंथाचे प्रुफ रिडिंग, प्रिन्टिंग, बांधणीचे काम सुरु केले व ठरलेल्या मुदतीत ग्रंथ तयार करून दिला. याबद्दल प्रेसचे चालक व सर्व कर्मचारी वर्ग धन्यतेस पात्र आहेत.

शेवटी भावनेच्या भरात कोठे विपरीत लिहिले गेले असेल अथवा अनवधानाने कांही मुद्रण दोष राहिला असेल तर सूज्ञ वाचकांनी, अभ्यासकांनी आमच्या निदर्शनास आणून दिल्यास पुढच्या आवृत्तीत पूर्तता करता येईल. पुन्हा एकदा सर्व सहकारी मित्रांचे मन:पूर्वक आभार मानून मी आपली रजा घेतो.

जय सतपंथ! जय श्री सद्गुरु!!

संपादक,

**आचार्य श्री जगन्नाथ महाराज.**

**अगत्याची सूचना :-**

'सतपंथ घटपाट पूजा यज्ञविधी' हा सतपंथ मार्गचा अत्यंत मौल्यवान असा नित्य नैमित्तिक व काम्य पूजा विधीच्या मंत्रांचा अमुल्य ग्रंथ आहे. संपूर्ण सत्पंथ वाङ्मयाचे दिग्दर्शन या ग्रंथाद्वारे होऊ शकते. सर्व अनुयायांनी अत्यंत शुचिर्भूत होऊन परमश्रध्देने या ग्रंथाचे वाचन करावे. अपवित्रपणात वृद्धिसुतक अथवा अस्पर्शपणात या ग्रंथास हात लावू नये. तशा अवस्थेत या ग्रंथास स्पर्श होऊ नये अथवा अस्पर्शपणाची छाया त्यावर पडू नये म्हणून स्वच्छ कपडयात त्यास चांगल्यारीतीने गुंडाळून एकान्तात उच्च पवित्र ठिकाणी ठेवावा. त्याची बेअदबी पायमल्ली करू नये. तसे झाल्यास ती व्यक्ति दोषास पात्र राहील व त्याचे दुष्पपरिणाम तशा व्यक्तिस अदृश्यशक्तिने भोगावे लागतील. ज्या व्यक्तिकडून या ग्रंथाचे सत्पालन होऊ शकणार नाही अथवा जे व्यसनी, दुराचारी, अभक्ष्याभक्षी अपेयपानी, नास्तिक असतील त्यांनी हा ग्रंथ संग्रही ठेऊ नये. सतपंथ धर्माच्या आचार्यांच्या परवानगी शिवाय कोणाही व्यक्तीस या ग्रंथाद्वारे स्वार्थाकरितां सार्वजनिक रुपाने पूजा करू नये कारण, पात्र अधिकारी व्यक्तिशिवाय अथवा आचार्यांनी नियुक्त केलेल्या व्यक्तिशिवाय या ब्रह्मासनावर बसण्याच कोणासही अधिकार नाही. स्वतंत्ररुपाने मंत्रवाचन वा पठन करण्यास हरकत नाही. श्रीसतपंथाच्या कलश घृतज्योत घटपाटच्या यज्ञविधी मंत्राची माहिती जनता जनार्दनास व्हावी केवळ याच उद्देशाने हा ग्रंथ प्रसिध्द केलेला आहे तरी प्रेमी भाविक सद्भक्तांनी योग्य ती समज घ्यावी हे नम्र निवेदन.

**प्रकाशक.**

॥ ॐ ॥

॥ श्रीमद्सद्गुरवे नमः ॥

प्रातर्वन्दनीय पूजनीय सद्गरु श्री इमामशाह महाराजांनी मुळबंध नावाचा गुजराथी-संस्कृत असा ग्रंथ तयार केलेला आहे. त्यात त्यांनी भगवंताचे अनंत चैतन्य स्वरूपाचे वर्णन केलेले आहे. अनाकलनीय अशा भगवत्स्वरूपाला भक्ताच्या प्रेमाने सगुण साकार रूप धारण करावेच लागले व भक्ताच्या साह्याकरिता त्याला वेगवेगळे अवतार धारण करावेच लागले. भक्तवत्सल भगवान भक्तावरील अनन्य प्रेमाने त्याची वैदिक पौराणिक वा मानसिक स्तुति ऐकून भावनावश होऊन कार्यरत झाला. हा भक्ताचा गौरव आहे. म्हणून प्रेमी भक्तांनो केवळ प्रेमास्पद अशा भगवंताचे गुणगान करणे हे आपले कर्तव्य आहे. खाली युगधर्मानुसार प्रत्येक युगाची गायत्री मंत्राने भगवंताची स्तुति केलेली आहे.

## १) प्रथम ऋग्वेदी गायत्री मंत्र :-

ॐ ॐ ॐ कारम्, अनादि पुरुषम्, न रूपम, न रेखा, निष्कलंक न पाणि, न पादः, अभूत् मंगलं वर्तते। ब्रह्मा ॐ ब्रह्मोन्नादः, आद्यरुपः वेदरेखामात्रः, महातेजाः परिब्रह्म चतुमूर्तिः, ईश्वरः कृतवान् वेदः, परिब्रह्मः। ऋग्वेदो रक्तवर्णः, वर्षादिविष्णुः ब्रह्मवंश पात्रः, अतीव परिब्रह्मः। परमेश्वरम् परम परमः, परिब्रह्मः प्रज्वालयति पातकम्, हुताशनमय तेजो वंशादि पात्रम्, वेदः परिब्रह्मः॥

## २) द्वितीय यजुर्वेदी गायत्री मंत्र :-

ॐ ॐ ॐ कारम्, वेदवायके अक्षरः ब्रह्मविभूतिः, पूज्यभूतात्, परिवर्तते, प्रज्वालयति पातकम्, परमेश्वरम्, परिब्रह्म रूपरेखः, वेदोअभूतु, जगती परमेश्वरः परापरम परमः परिब्रह्मः वंशादिः पात्रो अभुत् जगती वेदः परमेश्वरः परिब्रह्म सवॅ परिब्रह्मः शब्दः परमेश्वरः परिब्रह्मः यजुर्वेदो जरद्वर्णः वर्णादिविष्णु परिब्रह्मः॥

## ३) तृतीय सामवेद गायत्री मंत्र :-

ॐ ॐ ॐ कारम्, कृष्णादिवर्णम्, तदा वेदः परमेश्वरः उपजायमान धर्मः, तदार्थ पातकं प्रज्वालयते, सर्व वंशादि पात्रः पूजांगम् परिब्रह्मः तत्त्वम्, मंगलस्य महदगम्, वर्तेते शब्दश्चवेदश्च परिब्रह्मः ॐ शब्द परिब्रह्मः ॐ चक्षुः परिब्रह्मः ॐ उन्नादः महावेदो अङ्गम परिवर्तते विद्याङ्गम् परमेश्वरः परिब्रह्मः॥

## ४) चतुर्थ अथर्ववेदी गायत्री मंत्र :-

ॐ ॐ ॐ कारम्, कल्यंगकर्ता, विशतिविस्वापापम्. विश्वाधर्मः अरुध्दं पातकम् धर्मो रेखा मात्रः, धर्म इति परिब्रह्मः अथर्ववेदः श्वेतवर्णः वर्णादिविष्णुः सविष्णु नारायणः, ब्रह्माङ्गम् ब्रह्मवंशादिः पात्रः वर्णादि धर्मो म्लेछोअभूज्जगति, इच्छांगो विष्णुनारायणः , अतः परिवक्ष्यामि महाज्ञानभेदम्, जम्बुद्वीपे कलांगम् पवित्रं वर्तमानम्, महाकलीयुग उपजायते नारायण, तेजोभविता अंगकर्ता प्रज्वालयति पातकम् अनादिः पुरुषः मम जीवनं भवति, आर्यांगम् परिब्रह्मः षोडशकलागम् मंगलश्च सत्वानि सत्यात्रादि परमेश्वरः परिब्रह्मः अनादि पुरुष वेलागम भवति कर्मायति परिब्रह्मः स्थळे सेवागम्, नमः सर्व इति परिब्रह्मः परमेश्वरः परिब्रह्मः ॥

## ५) मोक्षमार्गनो गायत्री मंत्र :-

भरत खंडे इहः वृतंते स्वामी वास्ते गतः वर्तते परमसुखामीद्वीपे सद्वीपे जंबुद्वीपे कोटांग कोटांग जीवनंग परम मुक्तिमय मिंघः ओत्रंग देशंग कुमरीका क्षेत्रंग मुक्त गंगासत्य मुखंम बभूत नगर वैराटवामे भवेतंग, महासरस्वति साबरमति पूर्व त्रस्टे नवस्थळे गुर्मटे रेवा ओत्रंग, षोडश जोजनंग, पंचनदि मूळ स्थाने दिशा ओत्रंग, सत्यरुपी ब्रह्मवायके महानारायण वचने कलियुग अन्ते, बुध्दसास्त्रंग, हुरावरणे समावर्तंग दशांग सुरजांग महा मंगलंग, कुलपदः देह मासे दिवसे तिथी वार नक्षत्रे हुरावरणेः स्थापनाये, भ्रमंडे अे ते स्थळे उपजंते निष्कलंकी नारायण परिब्रह्मः आदे उपजंते परम प्रेम होत वंग क्षेत्र महाकलियुगे कृतवंग नारायण नवी सृष्टी स्थापंते. तदा होतवंग समात्यंग छेल्ली संधे निष्कलंकी नारायण परिब्रह्मः ने नमो नमः ॥

# सत्पंथात मुखी कोणाला म्हणतात ?

## ( मुखीचे क्रियाचरण )

प्रथम आठ लाख करण मध्ये सद्गुरू ब्रह्माजीये तप कर्या। त्यारे स्वर्ग, मृत्यु अने पाताळना सर्जननी आज्ञा ब्रह्माजीने आपी॥१॥ स्वर्गनी कूंची ब्रह्माजीने हाथ। नर्कनी कूंची यमदूतने हाथ॥२॥ जे धर्ममार्गे चालशे। ते सही अमरापुर महालशे॥३॥ त्या थशे सद्गुरू ब्रह्माजीना दर्शन। त्यारे चौद भुवनना देवता ब्रह्माविष्णुने द्वार॥४॥ जे स्वर्ग मृत्युने पाताळना गुरु। ते सद्गुरु ब्रह्माने ठाम॥५॥ आज तेनो भेद न जाणे कोई। पण साचा मुनिवर समजे सोई॥६॥ बीजा कोई न जाणे दुनियाना लोक। आज गुरु-नर (ब्रह्मा - विष्णु) रहया युगमा अलोप॥७॥ तेना चित्तनी कोई वात न जाणे। आप अेकला रहया वखाणे॥८॥ मा, बाप, बेन, बांधव नही कोई॥ त्या मुरख हाथ घसता जोई॥९॥ तमे साचा मुनिवर जाणो जेह। मन हठीला निश्चे नरके जाशे तेह॥१०॥ तमे गतमाहे मळो मुनिवर भाई। त्या अमीनिशानी लेजो जाई॥११॥ मुखी ते जे मोक्ष आले। मोक्ष मुक्तिनो मार्ग बतावे॥१२॥ मुखी ते जे कोईने घर जावे। तो ते जीवना दुःख दुर करावे॥१३॥ मुखी ते जे असत्यने मार्गे न जावे। ने जीवने मोक्ष मुक्ति करावे॥१४॥ मुखी ते जे सर्वे संकट काढे। ने लक्ष चौर्यायशीना फेरा टाळे॥१५॥ मुखी ते जे मृतकने जीवता करे। ने श्रध्दावानो ना कारज सरे॥१६॥ मुखी पासे जे जीव आवे। तेनी कमाईमा वृध्दि करावे॥१७॥ मुखी ते जे निर्मळ होवे। सारे जीवको वैकुंठ लावे॥१८॥ मुखी ते जे अमर भेद जाणे। अगम-निगमनी वात पिछाणे॥१९॥ मुखी ते जे भेद वरसादनो जाणे। सर्वना घरनी वात पिछाणे॥२०॥ मुखी ते जे देवने नजरे देखे। जन्म मरणना भेदज पेखे॥२१॥ मुखी ते जे सत्यवात साची करी जाणे। ते हक्क कमाई साची करी माने॥२२॥ ते कमाईनो मर्म पीछाणे। ते मुखीनी सेव अमर परमाणे॥२३॥ जे मुखीनी सेवा अमर जागे। ते सत्य सबुरी संतोष मागे॥२४॥ जे अेक मने अेक चित्ते सत्य धर्मने धाये। ते मुनिवर अमरलोकमा जाअे॥२५॥ जे दशांश-दाने खरा मुनिवर हशे। ते जीव अमरापुरमा जशे॥२६॥ तमे ऋषिवर साहेबसु राखो चित्त। गुरु गतमा मळवुं नित्य॥२७॥ तमे अमरापुरीमा जाशो सही। आज भूलवणीमा पडशो नही॥२८॥ भूल्या का भमो छो गमार। साचा ऋषिवर तो सचियार॥२९॥ ऋषिवर हशे ते साहेबना सैन्य मा मळशे। तेजी घोडे मुनिवर चडशे॥३०॥ गुरु गोविंदने ध्यानमा देखे। नित्य नित्य दर्शनसाहेबना करशे॥३१॥ ज्यारे साहेबने त्रिवेणीना तख्ते देखे। त्यारे नित्य नित्य दर्शने मुनिवर रहेशे॥३२॥ ज्यारे गोर गत करी जे तख्ते बेसशे। त्यारे नित्य नित्य दर्शने मुनिवर रहेशे॥३३॥ अेम बोल्या गुरु इमामशाह आज गुरु गतमा मळीने करो कमाई। तमे सत्ये चालो सचियारा भाई॥३४॥ सद्गुरु इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः॥

# देवस्थापना मंडाण. (देवस्थापन करण्याची रीत)

तमे सुणो मुनिवरो वेदविचार। मुखी तणा क्रिया आचार॥१॥ आवी गतना नमस्कार करे। अेकमना थई उभो रहे॥२॥ गुरुगतपासे मागे वचन। निर्मळ करावे जीव ने पिंड॥३॥ गुरु गत मळी ने करे आशिष। आज गतमाहे गुरुनर छे जगदीश॥४॥ त्या नानामोटा सहु करगरे। जपे जाप ने क्षमा मांगे॥५॥ करी प्रणाम ने माणज लेवे। त्या निर्विष थई ने उभो रहेवे॥६॥ हृदये राखे हरीनो जाप। क्षमा थकी उतरे पाप॥७॥ माण तणी आशिष जो करे। जपे जापने पातक उतरे॥८॥ दो जण मळी उतरावे माण। अेक बीजाने कही प्रणा॥९॥ माण उतारी उभो रहे। नमी गतने नमस्कार करे॥१०॥ अेकमना थईने डग जो भरे। मुखी तणे आसन संचरे॥११॥ आसने जई कहे हे जंदा॥ बक्षो गुना गुरु गतना बंदा॥१२॥ भीडी आसन बेसे काया। दिल थी दूर करे मोह माया॥१३॥ जे सत्य संतोषे बेसे सही। ते दया क्षमा अे रहेणी ये रही॥१४॥ पूर्व पश्चिम उत्तर दक्षिण। निश्चित दिशाये सन्मुख रहे॥१५॥ गुरु गतने पूछे प्रणाम। कही यज्ञनु मांडे काम॥१६॥ त्रण दरवाजा बंध जो करे। ज्या थकी पवन न संचरे॥१७॥ करी प्रणाम ने मांडे पाट। मुनिवर तणी मुक्तिनी वाट॥१८॥ मांडी कळशने अेकचित्त रहे। अक्षत लईने कलशमा धरे॥१९॥ फूल हार घटपाटे धरे। चुवा चंदन अर्पण करे॥२०॥ मांडी पाट पैसाने कलश जो लहे। धूप दिपने अर्पण करे॥२१॥ भरी कलशने गुजारे आप। बोले मंत्र हरिना जाप॥२२॥ मंत्र बोली निपावे नूर। मंत्रे निरंजन छे भरपूर॥२३॥ त्रणदेवनी पूजा करे। गंगोदक (नुर) लई कलशमा धरे॥२४॥ नुर माहे शक्तिनो वास। नुरे नारायण थया प्रकाश॥२५॥ पंच देव तो नुर माहे रहे। चोवीस पात्र कळयुगमा छे॥२६॥ अेक मना थई मुखी जो बोले। गुरु नर वंशे अेक करी जाणे॥२७॥ वंश गुरु नर आव्या सही। ज्ञानी मुखीये दिठा सही॥२८॥ प्रदक्षिणानु मोटु दान। पुजिये तो मेरु समान॥२९॥ अेवी आशिष मुखी जो करे। कळश आगळ प्रसाद तो धरे॥३०॥ जीवता मृतक होईरहे। सुख दुःख दिलना सद्‌गुरु सु कहे॥३१॥ पूजा करे कलशनी सार। माहे निरंजन सचराचार॥३२॥ मुखीते जे भार गत नो आपे सहे। पर वेदना दुःख दिलमां ग्रहे॥३३॥ मुखी ते जे मन मारीने रहे। मुख माहेथी कोईने कांई ना कहे॥३४॥ नित्य नित्य हाल गुजारे आप। आशिष बोली उतारे पाप॥३५॥ करी आशिषने छोडावे करम। गुरु नरनी क्रिया आचारे वधे धरम॥३६॥ बोले साचु ने वचन पाळे। ब्रह्मानंद परम सुख माणे॥३७॥ मुखी ते जे अेटली क्रिया करे। नित्य नित्य हाल गुजारे ने माण जे लेवे॥३८॥ मुखी ते जे क्रिया आचारसु निर्भय रहे। अेवी आशिष सद्‌गुरु इमामशाह कहे।३९॥ सद्‌गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः॥

# सतपंथात मुखी कोणास म्हणावे ?

मुखी याचा अर्थमुख्य, प्रमुख, खऱ्या अर्थाने जनतेचे प्रेम आकर्षित करून घेणारा मनुष्य. सद्‌गुरु इमामशाह महाराजांनी सतपंथाची रचना करतांना निश्चित केले आहे कीं जे पीठाधिश्वर आहेत ते आचार्य त्यांनी भगवा फेटा बांधावा हा त्यांच दंडक आहे. इतर वस्त्रे म्हणजे अंगरखा व धोतर व उपरणे पांढरे असले तरी चालेल, क्वचित ठिकाणी संपूर्ण भगवा वेष म्हणजे धोतर, अंगरखा, उपरणे व फेटा धारण केलेले हे आचार्य असतात. ते स्वत:ही पूजा करतात. त्यानंतर पूजा अर्चा करणारे मुखी असतात. त्यांचा वेष पांढरी पगडी, अंगरखा धोतर, उपरणे, पगडी नसल्यास टोपी असली तरी चालेल असा वेष मुखीचा असतो. मुखीच्या क्रियाचरणात सद्‌गुरु इमामशाहांनी म्हटले आहे की, प्रथम आठ लाख करण मध्ये सद्‌गुरु ब्रह्माने तपश्चर्या केली तेव्हा त्याला स्वर्ग, मृत्यु, पाताळ रचण्याची आज्ञा ब्रह्माजीला दिली. स्वर्गाची कुंची ब्रह्माजवळ व नर्काची कुंची यमदूताजवळ दिली. जे धर्म मार्गाने चालतील ते अमरापुरीत जातील. तेथे सद्‌गुरु ब्रह्माजीचे दर्शन होईल. चौदा भुवनातील देव लोक ब्रह्मा, विष्णुच्या द्वारी येऊन दर्शन करतील. जे स्वर्ग मृत्यु व पाताळाचे गुरु असतील ते सद्‌गुरु ब्रह्माचा अंशभूत असतात. आज त्याचा भेद कोणीही जाणू शकत नाही पण खरा मुनिवरच हा भेद समजू शकतो. या जगतात आई, बाप, बंधु बांधव हे सर्व मतलबाचे आहेत त्यांच्या फंदात पडल्यास मनुष्याला पश्चाताप करावा लागेल. जो खरा मुनिवर असेल तो हा भवसागर तरून जाईल पण जो हट्टी असेल आपलेच म्हणणे खरे आहे असा असेल तो निश्चयाने नरकात जाईल. हे मुनिवरा तू गतगंगेत सदैव राहा, अमृत पान करून प्रसाद प्राप्त करून घ्या. मुखी तो असतो जो गतजमातला मोक्ष मिळवून देतो. मुखी ज्याच्या घरी जाईल त्या जीवात्म्याचे दु:ख दूर होईल, मुखीने असत्याच्या मार्गाने जाऊ नये, जीवाला मोक्षगति देणे हे त्यांचे काम आहे. मुखी सर्व संकट दूर करतात. जीवात्म्याचा लक्ष चौर्यायशीचा फेरा मिटवितात. मुखी ते मृतक मनुष्यास जीवंत करतात आणि जे श्रध्दावान आहेत त्यांची श्रध्दा कायम ठेवतात. मुखीजवळ जे जीव जातात त्यांच्या कमाईत बरकत वृध्दि करतात. मुखी निर्मळ असतात. जीवात्म्याला वैकुंठ पदाची प्राप्ति करवून देतात. मुखी अमरतेचा भेद जाणतात आगम आणि निगम समजु शकतात, मुखी वृष्टीचा भेदजाणू शकतात. सर्वांच्या घरातील गोष्ट जाणू शकतात. मुखी देवांना नजरेने पाहू शकतात. जन्म मरणाचा भेद जाणू शकतात. मुखी सत्य गोष्ट खऱ्या रीतीने समजतात आणि आपल्या हक्काचीच कमाईत उदरनिर्वाह करीतील, आपल्या कमाईचे मर्म तेच जाणू शकतील अमरपणाची सेवा करतील, त्याची सेवाच अमर ठरेल जो सत्य, सबुरी आणि संतोष प्रभुजवळ मागेल. जे अेक मनाने अेक चित्ताने सत्यधर्मास जाणतील ते मुनिवर अमरालोकाला जातील. जे दशांश दान खऱ्या हृदयाने करतील ते अमरापुरीला जातील. जे ऋषिवर आपल्या स्वामीवर चित्त अविचल ठेवतील ते नित्य गुरु

गतगंगेत राहतील. हे ऋषिवर तुम्ही अमरापुरीला जाल जेव्हा तुमच्यात कोणतीच भुलभुलामण राहणार नाही. हे ऋषिवर भ्रमंतीत फिरू नका. सत्यतेने वागा. ऋषिवर भगवंताच्या सैन्यात सामील होईल ते तेजस्वी घोड्यावर स्वार होतील. आपल्या ध्यानात गुरु आणि गोविंदाला पाहतील त्यांनाच खरे भगवंताचे दर्शन होईल. आपल्या भृगुटीमध्यात आत्म स्वरूपाचा साक्षात्कार ज्याला होईल त्याला खरे भगवंत स्वरूप दिसेल. अशा प्रकारे सद्‌गुरु इमामशाहांनी मुखीच्या क्रियाचाराची व्याख्या करून दाखविलेली आहे ती लक्ष्यात घेऊन आचरण करा.

दुसऱ्या मंत्रात सद्‌गुरु इमामशाहांनी देवस्थापनेचे मंड्याण रचना कशी करावी याचे वर्णन केलले आहे. त्यात त्यांनी सांगितले आहे की, हे मुनिवरा मी तुला वेदविचार सांगतो तू ऐक. मुखीचे क्रियाचरण कसे असावे ते मी तुम्हास सांगतो. गतगंगेत येऊन मुखीने सर्वांना नमस्कार करावा. गतगंगेजवळ वचन मागावे, आपले मन निर्मळ करावे आपला पींड पवित्र करावा. गुरुगतगंगेसमोर आशीष मागावा, कारण आज गतगंगेत गुरुनराची आणि जगदीशाची शक्ति आहे. गतगंगेत लहान मोठा असा भेद करू नये, जाप जपून क्षमा मांगावी. प्रणाम करून माण-कलश डोक्यावर घ्यावा मनात कोणत्याही प्रकारची विषयाची बाधा आणू नये. हृदयात भगवंताच्या नामाचा जाप करावा. क्षमेच्या योगाने सर्व पापाचे प्रायश्चित घेता येते. माण घेऊन जो आशिष करतो त्याचे सर्व पातक उतरत असते. दोन जण मिळून ती माण उतरावी. एकाने दुसऱ्याला प्रणाम करून उतरावी. माण उतरवून उभे रहावे सर्व गतगंगेस नमस्कार करावा. एकमन होऊन पाऊल उचलावे आणि मुखी करितां ज्या आसनाची योजना केलेली असेल तेथे जावे. आसनाजवळ जाऊन हे जंदा म्हणावे आणि माझा गुन्हा माफ करा असे गुरु गतगंगेत सांगावे. आसनावर भीडून बसावे हृदयापासून मोह माया दूर करावी. सत्य संतोषाने बसून दया, क्षमा मनात धारण करावी. पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण निश्चित दिशेकडे सन्मुख बसावे. गुरु गतगंगेला प्रणाम करून यज्ञकार्य करण्यास सुरुवात करावी. तीन दरवाजे बंद करावे (जेथून हवेचा शरीरात संचार होतो ते दोन नाकपुड्या व एक तोंड.) प्रणाम म्हणून पाट मांडावा व मुक्तीदायक अशा मंत्राचा जाप करावा. कलश मांडून एक चित्त व्हावे. अक्षता घेऊन कळशात धराव्यात घटपाटाला फुलहार चढवावा. चुवा चंदन अर्पण करावे. पांट मांडून पैसा पूजावा, धूप दीप अर्पण करावा, कलशात पाणी भरून मंत्र जाप करावा. मंत्र म्हणून नूर करावे. मंत्रात निरंजनाची अपार शक्ति भरलेली आहे. तीनही देवांची पूजा करावी. नूराचा छाट देऊन पूजन करा. नूर मध्ये शक्तीचा वास असतो. नूराच्या योगेच नारायण प्रगट होतो. पंच देवांची पूजा नुराच्या योगे केली जाते. तसेच चोवीस अवतारांची सुध्दा उपासना केली जाते. अेकमन होऊन मुखी जे बोलेल भगवंत ते सत्य करून दाखविल. ज्या वंशात गुरु नर येतात ज्ञानी मुखीला ते सर्व समजून येते. कलशाला प्रदक्षिणा घालण्याचे

मोठे दान मेरुसमानाप्रमाणे आहे. अशी विनंती मुखी जर करील, कळश घटपाटाच्या पूजेत जो प्रसाद अर्पण करील, तोच खरा मुखी समजावा; जो जीवंत असून मृतक प्रमाणे राहतो आपले सुख दु:ख हरिलाच फक्त सांगत असतो. मुखी तोच जो आपल्या शिरावर गतगंगेचा भार सहन करतो परवेदना जाणून दु:खामध्ये दुसऱ्यांना जो मदत करेल दुसऱ्यांचे दु:ख जो स्वत: सहन करेल. मुखी तोच जो मन मारून राहतो, मुखातून कोणाला कांहीही बोलत नाही. गतगंगेत येऊन नित्य नित्य हाल गुजार करतो. आशिष म्हणून पाप उतारतो. खरे बोलून वचन पालन करतो. आपल्याच ब्रह्मानंदात सुखात डोलतो. मुखी ह्या सर्व क्रिया जो पालन करतो तोच खरा मुखी असे सद्गुरु इमामशाह महाराज सांगतात.

यावरून मुखी व आचार्यांनी कसे वागावे याचे मोजमाप सद्गुरु इमामशाहांनी सांगितलेले आहे. ह्या सर्व क्रिया जीवन्मुक्ताच्या आहेत. एवढे सर्व तत्व आपल्या जीवनात उतरले तर फारच फार चांगले होईल. पण जास्तीत जास्त तत्व आपल्या जीवनात उतरल्यास हवे आहे. जीवन हे क्षण भंगूर जाणून त्याचा कोणत्याही प्रकारचा भरवसा नाही. मानवी जीवनात आल्यावर कूड, कपट, असत्य, द्वेष, इर्च्छा, निंदा वगैरे करून काय उपयोग त्याच्याने कांही आपले कल्याण होणार नाही आपले कल्याण आपण सचोटीने वागू तेव्हाच होईल हे जाणून माणसाने योग्य बोध घ्यावा व तोच मनुष्य श्रेष्ठ जो आपली प्रौढी मिरवीत नाही धन संपत्ति ऐश्वर्य कीतीही जरी असले, ईश्वराच्या दरबारात आपले स्वत्व टिकवून जो राहतो तोच श्रेष्ठ गणला जातो, म्हणून हे सुज्ञ माणसा तू सामान्य नव्हेत तर श्रेष्ठ आहेस सामान्य माणसांना योग्य मार्गदर्शन करणे आपले कर्तव्य आहे. म्हणून मुखी व्हा हेच सद्गुरु महाराजांचे अंतिम सांगणे आहे.

# अनुक्रमणिका

ॐ

# श्री सतपंथ घटपाट पूजा यज्ञविधी

ये ते पन्थानोव दिवो ये भिविश्वमैरयः।
तेभिः सुम्नया धेहि नो वसो ॥१॥ अथर्ववेद कांड ७ सुक्त ५५
असपत्नं नो अधरादसपत्नं न उत्तरात्।
इन्द्रासपत्नं नैः पश्चाज्योतिः शूर पुरस्कृधि॥ अ. ८।५।१७
अप तस्य इतं तमो व्यावृतः स पाप्मना।
सर्वाणि तस्मिन ज्योतिषि यानि त्रीणि प्रजापतौ॥ अ. १०।७।४०

हे प्रभु, जे तुझ्या प्रकाशाचे मार्ग आहेत आणि ज्यायोगे तू स्वतः या जगताला चालवितोस त्या प्रकाशाने तू आम्हाला सुखाच्या मार्गाने घेऊन चल. तुझ्या प्रकाशाने आमचे संरक्षण होवो. ज्या ज्योतीने अंधःकार नष्ट होतो ते पापाहून विमुक्त आहे. जे तीन संयोग, वियोग आणि स्थिती आहे तेच रज, सत्व, तम रुपाने आहेत तेच ब्रह्मा, विष्णु, महेश या देवतांचे प्रतिक या ज्योतीच्या योगाने त्यांचे ध्यान केले जाते. या ज्योतीचे ध्यान करून गुरु जवळून प्राप्त केलेला मंत्र श्वासोच्छ्वासातून तालबध्द स्मरण करावे. त्यायोगे त्रिगुणी प्रकृतीला मुक्ति मिळून जो एकमेव सत्वगुण राहतो तोच प्रणवरुप पूर्ण ब्रह्म आहे.

## मंत्र १ ला

## दिवा ज्योतने प्रगटावी प्रणाम करवानो मंत्र.

**ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे.**

**गुरु दिवो गुरु देवता, गुरुबिना घोर अंधार, गुरुविना जुक्ति नही, गुरुविना मुक्ति नही, मन ताळु मंत्र कुंची, खोलो धर्मद्वार, तरीये भवसागर पार, जागे ज्योत भागे छोत सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः॥**

अस्थिरमय या जगतात गुरु हेच दीपस्तंभरुप असतात, त्यांच्या ज्ञानयुक्त प्रकाशाशिवाय संसार तरून जाण्याची दुसरी युक्ति नाही, मानवी मन हे मोठे कुलूप आहे तर गुरुमंत्र ही त्याची कुंची म्ह. किल्ली आहे. त्याच्याशिवाय हा असार-अपार सागर तरून जाताच येत नाही. ज्याठिकाणी ब्रह्मज्योत जागृत झालेली आहे, तिथे छूत-अछूतपणा राहूच शकत नाही. अशा आशयाचा हा मंत्र आहे. घरात ज्योत लावतांना हा मंत्र म्हणून नमस्कार करायचा असतो.

   

उदेनमुत्तरं नयाग्ने घृतेनाहुत।
समेनं वर्चसा सृज प्रजया च बहुं कृधि ॥१॥
इन्द्रे मंप्रतरं कृधि सजातानामसद् वशी।
रायस्पोषेण सं सृज जीवातवे जश्से नय ॥२॥
यस्य कृष्मो हविर्गृहि तमग्रे वर्धया त्वम्।
वस्मै सोमो अधि ब्रवदयंच ब्रह्मणस्पतिः ॥३॥ अथर्व. ६।५।१ ते ३

ज्या घरात अग्नी आहे त्या घरात हवन हे अवश्य झाले पाहिजे. त्या घराची हरेक प्रकारची उन्नति होते. त्यांना सुख आणि संपत्ति प्राप्त होते म्हणून हवन करणे अत्यंत लाभदायक असते. हवनाने आरोग्य, बळ दीर्घायु प्राप्त होते. धन, यश आणि बाकी सर्व अभ्युदय निश्रेयस प्राप्त होते.

## मंत्र २ रा

## उदधूप – लोभान मुकवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं, ॐ नमो श्री सदगुरु पात्र ब्रह्मा, इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे:-

धूप जले, अगर जले, लोभान जले, भवनी पीडा टळे, देव जागे दैत्य भागे, धूप त्यां रुप, देव त्यां पूजा, अलख निरंजन निराकार आत्मा देव अवर नही दूजा॥ सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः॥

ज्या अग्नीच्या योगाने उद-धूप-लोभान-गुगुळ-कापूर वगैरे हवनीय पदार्थ जळतात, तीळ, जव, तांदूळ, गहु, तूप वगैरे पदार्थ जळतात पण त्यांच्या संपर्काने संपूर्ण वातावरण शांत, पवित्र आणि शुचिर्भूत होते. अलख निरंजन निराकार आत्मपुरुषाला मंगलमय वातावरणाने शुध्द करणे आवश्यक असते. या मंत्रामुळे घरात असलेले दुःख, दारिद्र्य, दैन्य, भूतबाधा, पिडा निवारण होऊन घर व घरातील सर्व व्यक्ति व्याधिमुक्त होतात. घरातील व्याधी दैन्य जाऊन घर समृध्द होते व धंद्यात बरकत येते.



भवाशर्वाविदं ब्रूमो रुद्र पशुपतिश्च यः।
इषुर्या एषां संविद्मतानः सन्तु सदाशिवाः ॥९॥
दिवं ब्रूमो नक्षत्राणि भूमिं यक्षाणि पर्वतान्।
समुद्रा नद्योऽवेशन्तास्ते नो मुञ्चन्त्वहंसः ॥१०॥
सप्तर्षीर्न वा इदं ब्रूमोऽपो देवीः प्रजापतिम्।
पितृन् यमश्रेष्ठान् ब्रूमोस्ते नो मुञ्चन्त्वहंसः ॥११॥ अथर्व. ११।६।९ ते ११

भव आणि शर्व जे पशुपालक रुद्र आहेत, त्यांचे जे जे बाण प्रख्यात आहेत ते ते आमच्याकरितां नेहमी कल्याणकारी होवो. द्युलोक, नक्षत्र, भूमि, यक्ष, पर्वत, समुद्र, नद्या, जलाशये, सप्तर्षिगण, जल, प्रजापति पितृ आणि त्यांचा अधिपति अर्यमा हे सर्व पवित्र आणि शुध्द आहेत.

# मंत्र ३ रा

## अपवित्रने पवित्र करवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा, इन्द्र, इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्वामी तमे परम पवित्र, पवन पाणी पवित्र, धरती पवित्र, आकाश पवित्र, चन्द्रसुर्य पवित्र, सात समुद्र पवित्र, अष्टकुळ पर्वत पवित्र, नवकुळ नाग पवित्र, तन पवित्र, मन पवित्र, पाच करोडी प्रल्हाद पवित्र, सात करोडी हरिश्चंद्र पवित्र, नव करोडी युधिष्ठिर पवित्र, जतीया सतीया पवित्र पंचायतन पवित्र, प्रभु तमारा नामथी आ दास पवित्र. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः ॥

उद, धूप आपण स्वतः घेतल्यानंतर आपल्या स्वतःच्या शरीराला पवित्र करण्यासाठी हा मंत्र म्हणावा. पूजेस येतांना हातपाय धुवून उद घेतल्यानंतर हा मंत्र म्हणावा. अस्पर्श स्त्रियांनी चौथ्या दिवशी स्नान झाल्यानंतर उदधूप घेऊन हा मंत्र म्हणावा.



ये देवा दिविषदौ अन्तरिक्षसदश्च ये।
पृथिव्यां शक्रा ये श्रितास्ते नो मुञ्चन्त्वंहसः ॥१२॥
आदित्या रुद्रा वसवो दिवि देवा अथर्वाणः।
अंङ्गिरसो मनीषिणस्ते नो मुञ्चन्त्वंहसः ॥१३॥ अथर्व ११।६।१२-१३

द्युलोकात राहणारे जे देव आहेत आणि अंतरिक्षात राहणारे जे देव आहेत ते समर्थ देव जे पृथ्वीच्या आश्रयाला सुध्दा आहेत ते आम्हा सर्वांना पापापासून मुक्त करोत. आदित्य, रुद्र, वसु जे द्युलोकात निश्चल आहे. तसेच मननशील अंगीरस आहेत ते आम्हां सर्वांना पापापासून मुक्त करोत.

# मंत्र ४ था

## मुखीने क्षमामाटे भणवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

आ दास बालोबाल गुन्हेगार. रोहो रोह चरणे चरणे अपराधी आचारहीना खीना जीवजोनी कीडी मकोडीना अपराधभर्या, हेवा इर्षाभर्या, बोल्याचाल्या, दृष्टिसांभळ्या, चाल कुचाल, करतवहीना छे, स्वामी तमे अमारा सहु दोष परहरो, अमो पतीत जीवोने पावन करो, माता पिता सगा सहोदर तमे, गणगोत्र तमे, पतीत पावन त्राता तमे, अनंत अपराध अमारा, स्वामी क्षमा हजारवार आद्य अंतना धणी श्री निष्कलंकी नारायण जांबुद्विपना धणी, विष्णुनारायण, विश्वना आधार सृष्टीना सृजनहार जांबुद्विपे धर्यो अवतार, रोहिणीकीजे खेर, दिवसकीजे महेर, स्नेहनी दृष्टी करो, सेवकोना दु:ख दारिद्र्य दूर करो, सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

हे भगवन्! तू निर्माण केलेल्या व सर्व जीव प्राणिमात्रामध्ये स्थित असलेल्या या जगतातील प्राणिमात्राविषयी माझ्या मनात कोणत्याही प्रकारचा द्वेष, मत्सर, घृणा राहू नये, माझे अंत:करण शुध्द निर्मल व प्रेमळ कर. ज्यायोगे माझ्या चित्तात विश्वबंधूत्वाची भावना जागृत राहील अशी कृपादृष्टी मजवर कर. आमचे सर्व प्रकारचे दु:ख दारिद्र्य निवारण कर. अशा आशयाचा हा मंत्र आहे.



अदितेर्हस्तां स्त्रुचमेतां द्वितियां सप्तऋषयो भूतकृतो यामकृण्वन्।
सा गात्राणि विदुष्योदनस्य दर्विर्वेद्यामध्येनं चिनोतु॥ अथर्व. ११।१।२४
नमस्ते अस्तु विद्युते नमस्ते स्तनयित्नवे।
नमस्ते अस्त्वश्मने येना दूडाशे अस्यसि॥ अथर्व १।१३।१

जगत् निर्माण करणाऱ्या सप्तऋषिंनी ही कडछी निर्माण केली. या कडछीने वारंवार अन्न यज्ञवेदीवर टाक. हे विशेष प्रकाशमान तुला नमस्कार असो. गडगडाट करणाऱ्या भगवंता तूला नमस्कार असो. बर्फाच्या कडारुप ईश्वरा तुला माझे कोटी वंदन असो. ज्या योगे तू दु:ख देणाऱ्या दुष्ट प्रवृत्तींना दूर झुगारून देतोस.

# मंत्र ५ वा

## मुखीने आसन आगळ उभा रहीने स्तुति करवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

प्रथम ॐ कार, ॐ कारथी धुंधुःकार निरंजन निराकार, तमे सृष्टीना सृजनहार, स्वामी तमे धर्यो अवतार, स्वामी धर्ममाहे तमे, स्वामी सृष्टीमाहे तमे, प्रगट तमे, प्रत्यक्ष तमे, कायम तमे, नित्य तमे, आद्य तमे, अंत तमे, कळातमारी, अस्तित्व तमारु भावभक्ति अमारी, अमो सेवक अपराधी, स्वामी तमे अपराध क्षमा करणार, सेवकोने दर्शन देजो, फळंतर वेळामा उगारी लेजो, तमे आसने सिंहासने आवीने परवर्यो, किधा अपराध क्षमा करो, बीजा अपराध ना करावशो, पाच, सात, नव बार तेत्रीस करोडी अनंतना मेळा देजो, लक्ष चौर्याशीना फेरा टाळो, सकळसंघने दर्शन देजो, स्वामी ऐक्य करो, द्वैत दूर करो, धर्म स्थापो, पाप कापो, सहायता आपो, सतीयाओनी संगतमा राखो, समर्या सहाय करो, करगर्या काने धरो, आवागमन दूर करो, सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः॥

मुखीने आसन-सिंहासना समोर उभे राहून हात जोडून क्षमायाचना करावी. हे भगवंता मी या सिंहासनावर - ब्रह्मासनावर बसतो पण माझ्या हातून झालेल्या अपराधांची क्षमा करावी. माझ्या हातून त्रिविध तापांचे कायीक, वाचिक, मानसिक उल्लंघन होऊ नये अशी कृपा कर. अशा आशयाचा हा मंत्र आहे.

   

पुमान पुंसीऽधि तिष्ठ चर्मेहि, तत्रहयस्व यतमा प्रियाते।
यावन्तावग्रे प्रथमं समयथुस्तद वाक्यो यमराजे समोनम्॥ अथर्व. १२।३।१

माणसामध्ये जो सर्वात बलवान असतो तोच अधिष्ठाता होण्यास योग्य असतो, त्यानेच अधिष्ठाता व्हावे तोच मुख्य आसनावर बसण्यास पात्र असतो. तो आपल्या हितकारी अनुयायांना बोलावून एकत्र करतो. हा संघच शक्ति उत्पन्न करीत असतो आणि त्यायोगे राज्याचे नियंत्रण होत असते.

# मंत्र ६ वा

## मुखीने जमणो पग आसन उपर मूकी उभा रही प्रार्थना करवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं, ॐ नमो श्री सद्‌गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

हे जंदा कायम देव पाया, स्वामी पाया, स्वामीजीना दर्शन पाया, ऋषिवरोना राज पाया, अमरापुरना वास पाया, अनंत करोडीना सत्संग पाया, सद्‌गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः ॥

हे ब्रह्मासनावर स्थित असलेल्या ब्रह्मरूप देवा या तुझ्या आसनावर बसण्याची पात्रता व शक्ति तू मला दे. हे स्वामी तू साक्षात परब्रह्म स्वरूप आहे. तुझ्यात आणि आमच्यात कोणताही भेद ठेवू नकोस. तुझ्या अनंत करोडीचा सत्संग आम्हास लाभू दे.



# मंत्र ७ वा

## कलश धोईने पवित्र करवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं, ॐ नमो श्री सद्‌गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

पाणी पवित्र, पवन पवित्र, धरती पवित्र, आकाश पवित्र, चन्द्रसूर्य पवित्र, नव्वाणु करोडी यक्ष पवित्र, छप्पन करोडी मेघा पवित्र, बत्रीस करोडी किन्नर पवित्र, तेत्रीस करोडी देवता पवित्र, पाच करोडीशु प्रल्हाद पवित्र, सात करोडीशु हरिश्चन्द्र पवित्र, नव करोडीशु युधिष्ठिर पवित्र, अनंत करोडीशु कमळाकुंवर पवित्र, प्रभुना नाम पवित्र, प्रभुना नामथी आ कळस पवित्र सद्‌गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः ॥

आम्ही भक्तगण ज्या कलशाची पूजा करणार आहोत तो कलश पाणी, पवन, धरती, आकाश या साधनांनी पवित्र होवो, चन्द्रसूर्याप्रमाणे तो तेजस्वी होवो. नव्वाणु कोटी यक्ष, छप्पन्न कोटी मेघा, बत्तीस कोटी किन्नर, तेहतीस कोटी देवगण ज्याप्रमाणे पवित्र आहेत त्याप्रमाणे मांगल्याने युक्त असा आमचा कलश होवो. पाच कोटी प्रल्हादासोबत सात कोटी हरिश्चन्द्रासोबत, नऊकोटी युधिष्ठिरा सोबत, अनंत कोटी कमलाकुंवर सोबत जे जीव उध्दरले

गेले त्याच कलश पाटाची पूजा आम्ही करीत आहे. हे भगवंता आमच्या या पूजेस तेज दे. हे भगवंता तुझ्या नावाने या पवित्र अशा कलशाची पूजा आम्ही करीत आहोत. तू आमच्या या पूजेस स्थैर्य दे.

   

# मंत्र ८ वा

## पाट धोईने पवित्र करवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्थळे ब्रह्मा, झाडे विष्णु, डाले डाले महेश्वर, पानडे पानडे ऋषीवर अे देवताना चरक सदा सुफल हे जंदा कायम देव पाया सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः॥

हे भगवंता तुझ्या आशिर्वादाने आम्ही ज्या कल्पवृक्ष स्वरूप कलशाची पूजा करीत आहोत त्याचे थळ म्ह. खोड ब्रह्मा आहे, मुख्य शाखा विष्णु आहे आणि डाहाळ्या महेश्वर आहे. ऋषिमुनि गण यांनी पानापानावर वेदांच्या ऋच्या लिहून ती पाने आचारधर्म, मृत्यू लोकातील मानवाकरितां पाठविलेल्या आहेत. हे मुनिवर हे ऋषीमुनिलोक म्हणजे प्रत्यक्ष भगवंत स्वरूप आहेत. त्यांच्या आज्ञा पाळ, त्यात तुझे कल्याण आहे.

   

असंबाधे पृथिव्या उरौ लोके नि धीयस्व।
स्वधा याश्चकर्षे जीवन् तास्ते सन्तु मधुश्चुतः॥ १८।२।२०
मा त्वा वृक्षः सं बाधिष्ट मा देवी पृथिवी मही।
लोकं पितृषु वित्त्वधस्व यमराजसु॥ १८।२।२५

हे मानवा! पृथ्वीच्या बाधारहित विस्तिर्ण स्थानात दढतेने तू थांबला गेला आहेस. ज्या आत्मधारण शक्तिंना तू जीवन दिलेले आहे. त्या सर्व शक्ति तुझ्याकरिता ज्ञानाची वृष्टी करणाऱ्या होवो. हे मनुष्या! तुला केवळ सेवनिय संसार अथवा न चालणारी मोठी पृथ्वी कोणतीही बाधा करूं शकणार नाही. कारण की न्यायकारी परमात्मा यमधर्म यालाच ज्याने आपला राजा मानले आहे अशा रक्षक महात्म्यामध्ये ज्ञान स्थान पावून तू पुढील वाटचाल कर.

# मंत्र ९ वा

## पाट मांडवानो, घटना आसन-सिंहासन स्थापनानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं. ॐ नमो श्री सद्‌गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्वामी तमे ॐकार माहे आपोआप, शक्तिरुपी जपाव्यो जाप शक्तिरुपी रच्यो संसार, शक्ति वेद उत्तम आचार, हेठे शक्तीने उपर कला, पाच देव ते सभरे भर्या. आसन शक्ति नुरी तेज, नुरे सरज्या निरंजन हेत. श्रेष्ठ शक्ति माटी सही, माटी विना न उपन्या कोई. माटी घटने माटी पाट, माटी मोक्ष मुक्तिनी वाट. सद्‌गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः ॥

हे परात्पर परब्रह्मा! तू ॐ कारामधून आत्मस्वरूप धारण करून जगत्सृष्टि निर्माण केली. आद्यशक्तिच्या गायत्री सवितृ शक्तिंचा जप करून या संसाराची निर्मिती केली. याच शक्तिच्या कृपाप्रसादाने सदाचरण ज्या मनुष्याने केले तो सद्‌गतीस प्राप्त होतो. शक्तिरुप सिंहासनावर पाचही देवांची कला प्रगट झालेली आहे. उत्पत्ति, स्थिति व लय, शुध्दसत्वांश व निर्गुण ह्या कलांनी त्रिभुवनव्यापी सृष्टि निर्माण झाली. या शक्तिरुप सिंहासनावर नूर स्वरूप तेजस्वरूप भगवंत विराजमान आहे. त्याच शक्तिपासून श्रेष्ठ अशी पृथ्वी म्हणजे माती निर्माण झाली. पृथ्वीशिवाय या त्रिभुवनात कोणतीच सर्वश्रेष्ठ अशी शक्ति नाही. म्हणून आम्ही मातीस्वरूप भगवंताचे सिंहासन स्थापून त्याच मातीस्वरूप मृण्मय स्वरूप ईश्वराची उपासना करतो.

❋ ❋ ❋ ❋

सुत्रामाणं पृथिवीं द्यामनेहसं सुशर्माणमदितिं सुप्रणीतिम्।
दैवीं नावं स्वरित्रामनागसो अस्त्रवन्तीमा रुहेमा स्वस्तये॥३॥
वाजस्यनु प्रसवे मातरं महीमदितिं नाम वचसा करामहे।
यस्या उपस्थ उर्वन्तरिक्षं सा नः शमत्रिवरूथं नि यच्छात्॥ अथर्व. ७-६-३/४

उत्तम रीतीने शृंगारलेली, आत पाणी येऊ शकणार नाही, अशी ही उत्तम प्रकारची होडी, उत्तम रक्षक, तेजस्वी, अविनाशक सुखदायक, उत्तम चालक अशा मातृभूमीवर आम्ही आमच्या उत्तम कल्याणाकरिता उन्नत होत आहोत. उदा - अन्नाची उत्पत्ति करण्याकरिता अन्न देणाऱ्या मातृभूमीचे आम्ही यशोगान गातो. ज्यावर हे मोठे अंतरिक्ष आहे, ती मातृभूमी आम्हाला उत्तम प्रकारे सुख देवो.

❋ ❋ ❋ ❋

# मंत्र १० वा

## पाट मांडीने पगे लागवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्वामी तमारा दशे अवतारोने प्रणाम. पृथ्वीमाता तमने प्रणाम. माता वसुंधरा तमने प्रणाम. स्वामी तमे अलख तमे अमर तमे, कायम तमे, किरतार तमे, दर्शन देजो तमे. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः ॥

हे भगवंता! तू धारण केलेल्या दहाही अवतारांना प्रणाम असो. हे पृथ्वीमाते तुला प्रणाम असो. माता वसुंधरा हे संपूर्णचराचर जगत् तुझ्यात बसलेले आहे. हे स्वामीन् तूं अलक्ष्य आहेस, अमर आहेस. कायम (नित्य अविनाशी) आहेस. तू सर्वांचा उत्तम निर्माता आहेस. हे भगवंता तूं आम्हास दर्शन दे.



ब्रह्मास्य शीर्षं बृहदस्य पृष्ठं वामदेव्यमुदरमोदनस्य।
छन्दांसि पक्षौ मुखमस्य सत्यं विष्टारी जातस्तपसोऽधि यज्ञः ॥१॥

अथर्व ४/३४/१

या सेचन समर्थ वा अन्नरूप परमेश्वराचे शिर व वेद आहे. त्याची पाठ प्रबुध्द जगत् आहे, उदर मनोहर परमात्म्याशी संबंधीत आहे. याचे दोनही पार्श्वभाग आनन्दमय व पूजनीय कर्म आहे. याचे मुख सत्य आहे, हा संपूर्ण त्रैलोक्यात पसरलेला पूजनिय परमात्मा आपल्या ऐश्वर्याने सर्वांच्या वर प्रगट झालेला आहे.

# मंत्र ११ वा

## पाट उपर अक्षत् मुकवानो मंत्र (अक्षत् - चोखा)

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे:-

प्रथम आद्यनिरंजन धुंधु:कार, सृष्टीना कारणे गुरुनरे धर्या अवतार, धुंधु:कारमा ध्यानज धरी, छत्तीसजुगने चौर्याशी चौकडी पहेली करी. पहेले सर्ज्या ब्रह्मस्तन, तेथी सर्ज्या आत्मरतन, आपसतनथी झर्या नुर, तेना सर्ज्या चन्द्रने सुर्य. नारायणे सर्जी मुरत चार, चतुर्वेदने ॐकार. ॐकारथी सर्ज्या सतपंथ, धरी अवतारने, बांध्या बंध, स्वामी अथर्ववेदने चोक सिंहासने आवो घटमा आवीने वास करो, पाटनी पूजाये रहो, कळसमाहे कळा धरो, घटघटमा आवी परवर्यो, आद्यब्रह्माये घटपाट स्थाप्या चोदिश फेरवी दुहाई, अनंत रूपे चरित्र किधा कर्ता मूरत सोही. आ लोक, परलोक, देवलोक घटगंगा तथा आज्ञांकित सेवकोना आमंत्रण स्विकारो, कळसमाहे तमारी कळा धरो, निरंजन निष्कलंकी नारायण सद्गुरु इमामशाहे दर्शन दिधा, अने बार करोडी जीव उध्दार्या, सद्गुरुये स्थाप्या धर्म, सद्गुरुये जपाव्या जाप, सद्गुरुये किधा पाक, सद्गुरुये पुरी साक्ष, मुखी स्थाप्या सवा लाख. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम:॥

सर्व प्रथम आद्यनिरंजन धुंधु:कारामधून सृष्टीची निर्मिती होऊन, सद्गुरु ब्रह्मांनी अवतार धारण केला. अतिशय धुंध अशा निलवर्ण वातावरणात त्यांनी ध्यान केले. चौर्यायशी चतुर्युगे व शेवटची छत्तीस युगे एवढी वर्षे (१२,८४,६००००) ब्रह्मदेवाने तपश्चर्या केली. सर्वप्रथम ब्रह्म तनातून आत्मस्वरूप उत्पन्न झाले. त्या आत्मस्वरूपातून तेजस्वी असा भाग निर्माण झाला, तेच चंद्र व सूर्य होय. सच्चिद नारायणाने चार मूर्ति निर्माण केल्या. ब्रह्मा, विष्णु, महेश व आद्यशक्ति यापैकी ब्रह्मदेवाला सृष्टी निर्माण करण्यास सांगितले. त्याने आद्यशक्तिपासून ॐ या शब्द ब्रह्माची उत्पत्ति केली व तेव्हापासून सत्पंथाची स्थापना केली. तोच सन्मार्ग ब्रह्मदेवाने वेगवेगळ्या काळात अनेकानेक अवतार धारण करून उपदेशिला त्यापैकी विधाता रूपाने मानव प्राणिमात्रांचे स्त्री-पुरुष, पशुमात्रांत नर-मादीरुपाने बंध बांधले गेले, अशा रीतीने ऋणानुबंधाने प्राणिमात्र एकमेकांशी बांधले गेले आहेत.

या कलियुगात युगधर्मानुसार अथर्ववेद श्रेष्ठ आहे. हे भगवान तुम्ही, अथर्ववेदाच्या तत्त्वानुसार आम्ही उपासना करीत असलेल्या सिंहासनावर विराजमान व्हा, आमच्या घटपाट पूजाविधीत या. कलशात तुमचे वास्तव्य असू द्या. प्रत्येकाच्या शरीररुपी घटात तुमचे अस्तित्व असू द्या. आद्यब्रह्माने चौफेर द्वाही फिरवून विश्वातील अनंत चैतन्य व्यापक दिव्य शक्ति अमृतमय कलशात सामावलेली आहे हे सिध्द केलेले आहे. या विश्वातील देवतातुल्य दैविक शक्ति, परलोकातील दिव्यशक्ति, देवलोकातील दिव्यशक्ति या गतगंगेत व्यापक हो. हे स्वामीन् तुम्ही आमचे आमंत्रण स्विकारा. कलशात अनंत कला निर्माण करून त्यातील एकतरी कला आम्हाला द्या. हे निष्कलंकी नारायण हे सद्‌गुरु इमामशाह महाराज तुम्ही आम्हाला दर्शन द्या. तुमच्या कृपाशिर्वादाने कलियुग संधीकाळात बारा कोटी जिवात्म्यांचा उध्दार झाला. सद्‌गुरु ब्रह्माने युगधर्म स्थापन केला, सद्‌गुरुंना कलितारक षोडशाक्षरी जाप जपविला, सद्‌गुरुंनी आम्हाला पावन केले, सद्‌गुरुंच्या साक्षीने आम्ही पवित्र झालो. या कलियुगात सवालाख मुखी स्थापन करून सद्‌गुरु महाराज हचा युगधर्माचा प्रसार करणार आहेत.

   

इन्द्रो मा मरूत्वान् प्राच्या दिशः पातु बाहुच्युता पृथिवी द्यामिवोपरि
लोककृतः पथिकृतो यजामहे ये देवानां हुतभागा इहस्थ ॥२५॥

अथर्ववेद कां. १८ सु. ३ मंत्र २५ ते २८

मरूद्‌गण युक्त इन्द्र माझे पूर्व दिशेकडून येणाऱ्या आपत्तीचे निवारण करून रक्षण करो. ज्याप्रमाणे पृथ्वी द्यु देवतांचे रक्षण करीत असते त्याप्रमाणे रक्षण करो. आमच्या करिता लोक व परलोकाचा मार्ग बनविणाऱ्या देवजनांची आम्ही पूजा करतो व हविष्यान्नाद्वारा ते या संसारात विद्यमान असून जगताचे रक्षण करतात. दक्षिण दिशेस वसणाऱ्या सर्व देवता आमचे रक्षण करो. पश्चिमेकडे वसलेली अदिनशक्ति आदित्याद्वारा आमच्यावर चालून येणाऱ्या आपत्तीचे रक्षण करो. उत्तरेकडे बसलेली सोम देवता आमच्यावर चालून येणाऱ्या आपत्तींचे रक्षण करो.

# मंत्र १२ वा

## पाटने चार दिशाये पैसा मुकवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्वामी आज कलियुगनु वर्तमान जो आज आद्य नारायणनु स्थान. घटे ब्रह्मा, घटे विष्णु, घटे देव महेश्वर, घटमा चौद लोकनो वास, तेत्रीस करोडी देवतानो वास. घटमधे ब्रह्मा विष्णुनो परिवार, जे आज कलियुगमा होय तेनो वास. पात्र निष्कलंकी नारायण. सिंहासन तमारु तमे स्थापो तमे बेसो, सत तमारु, दत्त तमारु, धर्म तमारो, कर्म अमारु, भावभक्ति श्रध्दा अमारी, अमे सेवको अपराधी अमने तमारा चरणमा राखो. समर्या सहाय करो, करगर्या काने धरो. अवागमन दूर करो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

हे स्वामीन् आज वर्तमान काळी आद्यनारायणाचे स्थान या पाटावर आहे. घटात ब्रह्मा, विष्णू, महेश विराजमान आहेत, घटात चौदाभुवनातील देवलोक आहेत. घटात तेहतीस करोडी देवता आहेत. घटात ब्रह्माचा व विष्णुचा परिवार वसलेला आहे, या कलियुगात अवतार पुरुष नेमलेला आहे तो निष्कलंकी नारायण विराजमान आहे पण त्या सर्वांच्या मूळाशी असलेला आद्यनारायण हा पाट सिंहासन रुपाने स्थित आहे. हे स्वामीन् तुम्ही या सिंहासनावर बसा, या जगतातील सत् तत्वाने मी तुमचे पूजन करतो, दत्त (दानधर्म) रूपाने मी तुझीच उपासना करतो. तू उपदेशिलेला धर्ममार्ग हाच या जगताच्या मूळाशी आहे. आम्ही जे कर्म करू त्याचे भोग भोगविणारा सुध्दा तूच आहे. भाव भक्ति आणि अविचल श्रध्दा ठेवून कर्म करणे हे आमचे कर्तव्य आहे. आम्ही अपराधी आहोत आम्हाला तुमच्या चरणी आश्रय द्या. माझ्या हृदयात प्रत्येक प्राणिमात्राविषयी समत्व बुध्दि द्या. माझ्या अंगी असलेली कूकर्मदृष्टी काढून टाका. माझे आवागमनाचे फेरे मिटवा. हे भगवंता, मी तुला शरण आलेलो आहे.



ॐ यज्ञ यज्ञं गच्छ यज्ञपतिं गच्छ।
स्वां योनिं गच्छ स्वाहा॥ अथर्ववेद कांड ७ सुक्त ९ मंत्र ५

हे यज्ञस्वरूप नारायणा! आपण पूजनीय परमात्म्याजवळ जाऊन ज्यायोगे प्रतिष्ठित झालात अशा सिंहासनावर विराजमान होऊन भक्तांना दर्शन द्यावे. या जगतातील परमेश्वरी शक्ति शुध्द तूपाच्या आहुति द्वारा भगवंताशी एकरुप होऊन भक्तांचे मनोरथ पूर्ण करो.

# मंत्र १३ वा

## पाटे पैसा मुकी पगे लागवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरुं छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र, ब्रह्मा, इन्द्र, इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

प्रथम आद्यनारायणे किधो विस्तार, त्यारे दिशा आलेखी चार, चतुर दिशामा किधा चतुरमुकाम, त्यां सद्गुरूये देखाडया हरीनु धाम. प्रथम दशरायण, द्वितीय देवगुण, तृतीय पंखला, चतुर्थ करण कल्पनी शाखाधरी, गुरुयेनाम भणाव्या श्रीहरी. यक्ष, मेघा, किन्नर, देवअनंत जेणे सद्गुरुसु राख्या अविंचल चित्त. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

प्रथम आद्यनारायणाने संपूर्ण सृष्टीचा विस्तार केला तेव्हा सर्वप्रथम चार दिशांची आखणी केली. चारही दिशेस भगवंतानी मूर्त स्वरूप देऊन आपण स्वत: वेगवेगळ्या रूपाने वास्तव्य केले. सद्गुरु ब्रह्मांनी हे श्रीहरीचे स्वरूप ओळखून त्यांचे वास्तव्य दाखविले. अनंत काळाची आखणी करून प्रथम दशरायण, दुसरा देवगुण, तीसरा पंखला व चौथ्या करण कल्पाचे ज्ञान करवून दिले. दशरायण कल्पात यक्ष देव निर्माण केले. यक्ष अथवा जखा देव अत्यंत तेजस्वी, महापराक्रमी, वेळप्रसंगी प्राणिमात्रांचे स्वरूप धारण करणारे अथवा मानवरूप धारण करणारे असे यक्षदेव दशरायण कल्पातील जीवात्मे होते. देवगुण कल्पात मेघा देव निर्माण झाले. ते सुध्दा अत्यंत तेजस्वी, महापराक्रमी मेघाप्रमाणे असून वेळ प्रसंगी प्राणिमात्राचे स्वरूप धारण करणारे अथवा मानवरूप धारण करणारे असे मेघदेव देवगुण कल्पातील जीवात्मे होते. तिसऱ्या पंखला कल्पातील देवगण किन्नर या नावाने ओळखले जातात. मानव शरीर व घोडयाचे तोंड असलेले हे देव तेजस्वी महापराक्रमी, गायनकलेत निपूण असे जीवात्मे होते. चौथ्या करणकल्पात (श्वेतवाराह कल्पात) पूर्ण मानवाकृति जीवात्मा निर्माण झाला. करण कल्पात सत्य, त्रेता, द्वापार कलियुगात पाच कोटी, सात कोटी, नव कोटी व बारा कोटी जीवात्मे मानववंशात झाले तेच तेहेतीस कोटी जीवात्मे होय. (अन्य शास्त्रात ८ वसु, ११ रुद्र, १२ आदित्य व २ अश्वीनीकुमार यांनाच ३३ कोटी देव मानतात.) कलियुगाच्या अंति अनंत कोटी जिवात्म्याचा उध्दार होईल अशी मान्यता सत्पंथशास्त्र व पंचदशीशास्त्र यांची आहे. ज्यांनी सद्गुरुब्रह्मावर अविचल श्रध्दा ठेवली ते जीवात्मे मोक्षगतीस प्राप्त झाले.

सत्पंथ घट आणि पाट पूजाविधीत सिंहासन आणि त्यावर स्थित कलशाचे अधिक महत्व आहे. तो एक कर्मकांडाचा भाग आहे. पण सद्गुरु इमामशाहांच्या मान्यतेनुसार सिंहासनाचे जे चार पाय आहेत ते दान, दया, तपश्चर्या, शुचिर्भूतता हे होत.

दान – सचोटीच्या संपत्तितून कामनारहित (निरीच्छबुध्दीने) व निरहंकार बुध्दीने दानधर्म करणे. केवळ लौकिकाकरीता नव्हे.

दया – संपूर्ण जीवप्राणिमात्रावर आत्मौपम्य दृष्टीने प्रेम व संगोपन करणे.

तपश्चर्या – संसाराचा ताप सहनकरून विकारावर ताबा ठेवणे.

शुचिर्भूतता – अंतरबाह्य शरीरशुध्दी, मानसिक व आत्मिकशुध्दी पाळणे.

ह्या चारही तत्वावर हे सिंहासन स्थित असून त्यावर विराजमान कलश भगवंताची पूजा अर्चा करणे हे सत्पंथ मार्गातील महत् कर्मकांड आहे. पैशांच्या रूपाने हे चार पाय होत.



ॐ उदेनमुत्तरं नयाग्ने घृतेनाहुत।
समेनं वर्चसा सृज प्रजया च बहुं कृधि ॥१॥
इन्द्रेमं प्रतरं कृधि सजातानामसद् वशी।
रायस्पोषेण सं सृज जीवातवे जरसे नय ॥२॥
यस्य कृण्मो हविर्गृहे तमग्ने वर्धया त्वम्।
तस्मै सोमो अधि ब्रवदयंच ब्रह्मणस्पतिः ॥३॥

अथर्ववेद कांड ६ सुक्त ५ मंत्र १ ते ३

ज्या घरात अग्नि, इंद्र आदि देवतांच्या नावाने हवन होत असते, उद, धूप, लोभान, तूप आदि द्वारा हवन होते त्या घराची हरेक प्रकारे उन्नति होत असते. त्यांना सौख्य आणि संपत्ति प्राप्त होते. म्हणून हवन करणे हे नेहमी लाभदायक असते. हवनाने आरोग्य बळ दीर्घायु प्राप्त होऊन धन, यश आणि दुसरा सर्वच प्रकारचा अभ्युदय आणि निश्रेयस प्राप्त होत असते.

# मंत्र १४ वा

## कलशने धूप मुकवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र, ब्रह्मा, इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

धूप जले, अगर जले, भवनी पीडा टळे, देव जागे दैत्य भागे, धूप त्यां रूप, देव त्यां पूजा, अलख निरंजन निराकार अवर देव नही दूजा. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः॥

ज्या मंदीरात अथवा घरात उद, धूप, अगर यांची आहुति दिली जाते ते घर निर्मल, शुध्द आणि निर्जन्तुक, पवित्र होत असते. त्या घरातील सर्व पीडा बाधा दुर होऊन त्यांच्या कमाईला बरकत येते. त्या घरातील सर्व प्रकारच्या कटकटी कंकास दूर होतात व सौख्य शांति नांदते. देवता जागृत होतात त्या संततीवर व संपत्तीवर चांगल्या प्रकारचे संस्कार देतात. दैत्य भाव, आसूरीभाव, भूत बाधा, आळस, कंकास मिटतात, धूप तेथे रूप सौंदर्य, सहृदयता प्रेमभाव वास करतो. देवतांचे वास्तव्य होऊन ते एक आदर्श घर म्हणून ओळखले जाते. अलख निरंजन निराकार देवाचे वास्तव्य तेथे असते.



ॐ ये ते पन्थानोऽव दिवो येभिविश्वमैरय:।
तेभि: सुम्नया धेहि नो वसो ॥१॥ अथर्व ७/५५/१
असपत्नं नो अधरादसपत्नं न उत्तरात।
इन्द्रासपत्नं न: पश्चाज्योति: शूर पुरस्कृधि॥ अथर्व. ८/५/१७
अप तस्य हतं तमो व्यावृत: स पाप्मना।
सर्वाणि तस्मिन ज्योतिंषि यानि त्रीणि प्रजापतौ॥ अथर्व. १०/७/४०

हे प्रभु! जो तुझा प्रकाशाचा मार्ग आहे आणि ज्यायोगे तू या जगताला चालवितोस त्या तुझ्या सत् रुप प्रकाशाने घेऊन चल व आम्हास सुख दे. चारही बाजुने आमचे संरक्षण कर आणि आमच्या समोर प्रकाशाचा मार्ग स्थिर कर. ज्या ज्योतीने अंध:कार नष्ट होतो ती ज्योति आमचा पाप परिमल नष्ट करो. संयोग, वियोग, स्थिती अथवा रज, सत्व, तमात्मक ब्रह्मा, विष्णु, महेश यांच्या प्रतिक रुप आहेत. या ज्योतीचें ध्यान करून गुरुकडून मिळालेला मंत्र, श्वासोश्वासाबरोबर तालबध्द रुपाने स्मरण करावे त्रिगुणात्मक प्रकृतितून मुक्ति मिळण्याकरितां शुध्द सत्वांशरुप प्रणवब्रह्म हाच पूर्ण परिब्रह्म आहे.

# मंत्र १५ वा

## कलशने दिपदर्शन करवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा, इन्द्र इमामशाह, आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

गुरु दिवो, गुरु देवता, गुरुविना घोर अंध:कार, गुरुविना युक्ति नही. गुरुविना मुक्ति नही. मन ताळु, गुरुमंत्र कुंची खोलो धर्मद्वार. तरीये भवसागर पार. जागे ज्योत भागे छोत सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम:॥

या संपूर्ण विश्वात गुरु हे तेजस्वरूप आहेत. गुरु हे देवता स्वरूप आहेत. संपूर्ण विश्वातील सृष्टिचक्रचालक देवता, ग्राम देवता, स्थान देवता, कुळ देवता (कुळदैवत) हे गुरुचरणी स्थिरावलेले विराजमान झालेले आहेत म्हणून ज्यांनी गुरु केलेला असतो त्यास नविन कुळदैवत शोधण्याची आवश्यकता नसते. गुरुवर निःसीम भाव हेच त्याचे सर्वकाही असते. गुरुशिवाय जगतात घोर अंध:कारमय स्थिती असते. गुरुशिवाय संसार सागर तरून जाण्याची युक्ति प्राप्त होत नाही. गुरुशिवाय मुक्ति सुध्दा मिळू शकत नाही. मानवी मनास विकार रूप कुलूप लागलेले असून गुरुमंत्ररूप किल्लीने ते जर उघडले तर धर्मद्वारास लागलेले कुलूप उघडेल व हा भवसागर सुलभ रितीने तरून जाता येईल. जेथे ब्रह्म ज्योत तेवत असते तेथे छूत अछूत असा भेदच राहात नाही. तेथे सर्व जीव प्राणिमात्र एकरुप होतात.



१) ॐ अप्स्व १ न्तरमृतमप्सु भेषजम्। अपामुत प्रशस्तिभिरश्वा।
भवथवाजिनो गावो भवथ वाजिनी:॥ अथर्व १/४/४

२) आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न उर्जेदधातन। महे रणाय चक्षसे॥
अथर्व. १/५/१

३) हिरण्यवर्णा: शुचय: पावका यासु जात: सविता यास्वग्नि।
या अग्निं गर्भ दधिरे सुवर्णास्ता न आप: शं स्योना भवन्तु ॥१॥

४) यासां राजा वरूणो याति मध्ये सत्यानृते अवपश्यन् जनानाम्।
या अग्निं गर्भ दधिरे सुवर्णास्ता न आप: शं स्योना भवन्तु ॥२॥

५) यासां देवा दिवि कृण्वन्ति भक्ष्यं या अंतरिक्षे बहुधा भवन्ति।
या अग्निं गर्भ दधिरे सुवर्णास्ता न आप: शं स्योना भवन्तु ॥३॥

६) शिवेन मा चक्षुषा पश्यताप: शिवया तन्वोप स्पृशत त्वचं मे।
घृतश्चुत: शुचयो या: पावकास्ता न आप: शं स्योना भवन्तु ॥४॥
अथर्व. १/३३/मं. १ ते ४

७) दिव्यं सुपर्ण पयसं बृहन्तमपां गर्भं वृषभमोषधीनाम्।
अभिपतो वृष्टया तर्पयन्तमा नो गोष्ठे रयिष्ठां स्थापयाति ॥१॥
अथर्व. ७/३९/१

१) जलामध्ये अमृत आहे. जलात औषधी आहेत. जलाच्या प्रशंसनीय गुण धर्माने घोडा बलवान बनतो आणि गाईसुध्दा बलवान होतात.

२) हे जल! तू सुखकारक आहे म्हणून तू आम्हास बळ दे. व रमणिय दिसण्याकरिता आम्हाला पुष्टी दे.

३) जे सुवर्णाप्रमाणे चकाकणारे आहे. शुध्दता आणि पवित्रता वाढविणारे आहे. सूर्य आणि अग्निप्रमाणे प्रकाशमान असे जल अग्निला गर्भात धारण करते; ते जल आम्हा सर्वांना सुखदायक होवो.

४) जलामध्ये असलेला वरूण राजा मनुष्याच्या सत्य असत्य कर्माचे अवलोकन करतो. उत्तम रंगाचे जल अग्निला गर्भात धारण करते ते जल आम्हा सर्वांना शांति आणि सुखदायक होवो.

५) देवगण द्युलोकात ज्याचे प्राशन करतात व ते अंत:रिक्षात अनेक रुपाने राहते ते जल आम्हाला सुख व शांति देवो.

६) हे जल! कल्याणकारी नेत्राद्वारे तू अमाच्याकडे पहा. कल्याणकारी स्पर्शाने आमच्या त्वचेस स्पर्श कर. ते तेजस्वीता देणारे शुध्द आणि पवित्र जल आम्हाला सुख शांति देवो.

७) आकाशात राहणारे, जलाची भयंकर वृष्टी करणारे, औषधी व वनस्पतीला आपल्या गर्भात वाढविणारे, सर्व प्रकारे वृष्टीद्वारा तृप्त करणारे, शोभायुक्त स्थानात राहणाऱ्या मेघास देव आमच्या गोशाळेच्या भूमीत स्थापन करो. अर्थात आमच्या भूमीत उत्तम प्रकारची वृष्टी होवो.

## मंत्र १६ वा

## कलशमां जल भरवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरु छुं, ॐ नमो श्रीसद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

ॐ उनाद, साद, शब्द, नूर, तेज, बिंब, आपोआप उपाया ईंड ईंडमाहेथी सर्जा पींड, पींडमाहे इच्छा किधी. अनंत लीला वर्ती लीधी. ईंड छेदीने उपन्या आप. चतुरमूरतनी किधी थाप. कहीं प्रणामने ॐ कार. प्रगट किधी मुरत चार. खाणी वाणी सर्ज्या वेद जुजवा वाराने जुजवा भेद, हरिवंशमा छे भरपूर स्थळ बांधी सर्ज्या नूर. नूर करी अजंपाजाप, चतुर मूरतने निरंजन आप. अनंत देवने उपन्या ब्रह्म. मत्स्ये कळा करी स्थाप्या धर्म. स्वामी पुरुषने शक्तिसार, विष्णु जळ कलश किरतार, आशापुरो वास करो, नूरनो प्रकाश करो. कलशमाहे कळा धरो. ऋषीवर जीवने पावन करो. सद्गुरु इमामशाह अरज करे, भरतखंडे जांबुद्विपे कुवारीका क्षेत्रमाहे श्री निष्कलंकी नारायण रुपे कलशमाहे कळा धरो, घटमाहे तमारो वास करो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

सतचिद्आनंदाच्या अनंत चैतन्य स्वरूपातून उनाद निलवर्ण धुंधुकार झाला. त्यातून ॐ प्रगटला. त्यापासून शब्द ब्रह्म प्रगटले व त्याचे साद संपूर्ण वातावरणात प्रसृत झाले. त्यातून नूर, तेज प्रगटले व त्यानंतर बिंब झाले. बिंबापासून आपोआप ईंड झाले. बिंबातून जल व जलात ईंड प्रगटले. ईंडापासून पींड झाला व पींडामधून इच्छामात्रे अनंत लीला धारण करणारी शक्ति निर्माण झाली. ईंडाचा छेद होऊन आत्मचैतन्य स्वरूप जीवात्मा प्रगट झाला. सर्व प्रथम चतुरमूर्ति प्रगटल्या. ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, आद्यशक्ति. त्या सर्वांनी आपल्या उत्पत्ति कर्त्या भगवंताला प्रणाम करून आपापल्या योगमायेच्या शक्तीने वेगवेगळे सृष्टीचे कार्य करू लागले. चारखाणी श्वेदज, अंडज, उद्भीज व जारज चारखाणी वैखरी, मध्यमा, पश्यंति, परा ह्या वाणी सुध्दा निर्माण झाल्या, चतुरयुगे निर्माण होऊन वेगवेगळे अवतार भगवंताने धारण केले. हरिवंश वृक्ष सुरु झाला व भगवंत आपापल्या चतुरमूर्तीच्या माध्यमातून वेगवेगळे कार्य करू लागले. अशा प्रकारे सृष्टीत विविधता आली. अनंत चैतन्य मूर्तस्वरूप झाले. मत्स्यरुप भगवंताने अनंत कळा करून धर्माची स्थापना केली. अनंत चैतन्य स्वरूप आपल्या योगमाये द्वारा अनंत क्रिडा करू लागले. विष्णु भगवंत कलश रुपाने प्रगट होऊन ब्रह्माद्वारा स्थापीत सिंहासनावर स्थानापन्न झाले. त्यात जल रुपाने भगवंतच प्रगट झाले. हे जलरूप भगवंता तू या कलशात स्थानापन्न झालेला आहे. अनंत अशा कळा धारण करून आमच्या सर्वमनोकामना, आशा, आकांक्षा, इच्छा, तू तुझ्या कळेने पूर्ण कर. या तुझ्या ऋषिवर सद्भक्तांना पावन कर. पवित्र करून पदरात घे. सद्गुरु इमामशाह अजीजीने अर्ज करून सांगतात की भारतखंडात, जंबुद्विपात, कुवारीका क्षेत्रावर श्रीनिष्कलंकी नारायण रुपाने प्रगट होऊन भक्तांचे सारे मनोरथ पूर्ण कर. या कलशात तुझी अनंत कळा धारण करून वास्तव्य कर.

(कोणत्याही ठिकाणी कलशात पाणी भरावे. दुध भरू नये. पाणी हे निसर्ग निर्मित आहे. दुध हे प्राणिनिर्मित असल्याने कलशात पाणीच भरावे असा शास्त्रीय दंडक आहे. मंत्रोपचाराने पाण्यावर ज्या क्रिया केल्या जातात त्या भारलेल्या पाण्याने जीवात्म्याचे संपूर्ण मनोरथ पूर्ण होतात.)



विष्णोर्नु कं प्रा वोचं वीर्याणि यः पार्थिवानि विममे रजांसि।
यो अस्कभायदुत्तरं सधस्थं विचक्रमाणस्त्रेधोरुगाय॥ अथर्व ७/२६/१

हे जिवात्म्यांनो! विष्णु व्यापक परमेश्वराच्या पराक्रमाचे वर्णनातीत स्वरूप जाणून घेण्यास तत्पर व्हा. ज्याने शिघ्राति शिघ्र व उत्तम सुख देणारे असे रुप धारण केलेले आहे. ज्याने भूमिस्थ आणि अंतरिक्षस्थ संपूर्ण लोकांची रचना केलेली आहे. ज्या अनंत उपदेशक प्रभुने सर्व प्राणिमात्रांच्या अंति असलेल्या अंतिम सत्याचा उपदेश केला, त्या कारणरूप भगवंताने जगताची उत्पत्ति, स्थिती व प्रलय रुपाने तिन्ही लोकांची स्थापना केली त्या परमसत्य रूप भगवंताची आम्ही उपासना करतो.

# मंत्र १७ वा

## कलश मांडीने पगे लागवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञार्थी आदरू छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

विष्णु उपजंते, महाशक्ति उपजंते अनंत तत्त्वम्. स्वामी तमारू सिंहासन स्थापो. तमे नूरे परवर्यो. घटमाहे वास करो. तमे अनंतवार स्थापो, तमे अनंतवार ओचरो. तमे अथर्ववेदने वायके फळो. तमे आद्यनारायण कळाप्रकाशी त्रण देव पेदा किधा ते देव युगे युगे आवी अवतर्या, घटे ब्रह्मा, घटे विष्णु, घटे देव महेश्वर. अथर्ववेदनी कळा धरो, घटमा ईश्वर, तमे कर्ता, तमे हर्ता, आद्यब्रह्माये घटपाट स्थापी चोदिश फेरवी दुहाई, अनंत रूपे चरित्र किधा कर्ता मुरत सोही. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

सिंहासनाधिष्ठित कलश भगवंताला दोनही हात जोडून नमस्कार करावा व याप्रमाणे मंत्र म्हणावा. हे विष्णुरुप भगवंता, हे आद्यशक्तिमाया! तूम्ही अंनत तत्त्वाने या जगतात व्यापक झालेले आहात. हे स्वामिन् तुमच्या या मृण्मय सिंहासनाला नमस्कार असो. हे भगवंता! तुम्ही अपरिमित तेजरुपाने या घटात वास्तव्य करा. तुम्ही युगायुगाच्या ठायी अनेकानेक रुपाने स्थापीत झालेला आहांत. अनंत प्रकारचा युगधर्माचा आचार तुम्ही जगताला सांगितला. या कलियुगात युगधर्म प्रणालीनुसार अथर्ववेद हा प्राधान्यभूत वेद आहे व सद्भक्तांना तशाप्रकारचे फळ अर्पण करतात. आद्यनारायणाने अथर्ववेदानुसार आपली कळा प्रकाशित करून तीन देवांची स्थापना केली व अनंत काळापासून युगयुगाच्या ठायी अवतार धारण करून धर्माची स्थापना केली. त्या युगधर्माचा प्रकाश सर्वत्र पसरलेला आहे.



**ब्रह्मास्य शीर्षं बृहदस्य पृष्ठं वामदेव्य मुदरमोदनस्य।**
**छंदांसि पक्षौ मुखमस्य सत्यं विष्ठारी जातस्तपसोऽधि यज्ञः ॥१॥**

**अथर्ववेद कांड ४ सुक्त ३४ मंत्र १**

**या अन्नाचे शिर ब्राह्मण आहे. पाठ क्षत्रीय, मध्यभाग वैश्य आहे. छंद त्याचा डावा-उजवा भाग आहे. सत्य त्याचे मुख आहे. या अन्नाद्वारा विस्तृत यज्ञ सिध्द होतो.**

# मंत्र १८ वा

## कलश उपर अक्षत मुकवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरू छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

प्रथम आद्य निरंजन निराकार, धुंधु:कारथी ॐ कार सृष्टीतणो किधो विस्तार, स्वामी तमे धर्या अवतार. मनमाहे हरीये धर्या हेत, त्यारे रच्यु एक ब्रह्मज क्षेत्र, ब्रह्मतनथी झर्यानुर, त्यारे सरज्या आत्मरतन भरपूर. हरीये किधा द्रष्टे काम, त्यारे सर्ज्या पींड अने प्राण, पींडमाहे मुकी माया अनंतस्वरूपी सर्जी काया. जळ अक्षते पुरोवास, आद्यनिरंजन माहे प्रकाश. कळशे चार मुरत मळी करो जुक्ति ऋषिवर जीवोने आपो मुक्ति. जांबुद्विपे भरतखंडे कुवारीका क्षेत्रे स्थळे बेसो. तमे निरंजन निष्कलंकी नारायण सद्गुरु ब्रह्मा तमे अक्षतरुपे कळशमाहे कळा धरो, घटमाहे तमारो वास करो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

सर्वप्रथम भगवंताचे स्वरूप आद्यनिरंजन निराकार होते, निलवर्ण धुंधुकारामधून संकल्पमात्राने ॐ कार स्वरूप प्रगटले व नादब्रह्मामधून ह्या संपूर्ण सृष्टीचा विस्तार झालेला आहे. हे भगवंता तू या अवनीतलावर निरनिराळे अवतार धारण केले. भगवंताने मनात हेतु धारण करून संकल्प मात्रानेच एक ब्रह्मांड रचले. ब्रह्माच्या तनामधून योगमाया निर्माण झाली. ब्रह्म व तारक मायेपासून आत्मतत्व निर्माण झाले. ब्रह्म आणि अविद्यामायेपासून जीवप्राणिमात्रांची उत्पत्ति झाली. भगवंताने केवळ द्रष्टा राहून केवळ साक्षीभूत राहून जगत् कार्य निर्माण केले. त्यात आत्मतत्व व अविद्या यांच्या संयोगापासून पंचीकरण झाले व वेगवेगळे प्राणिमात्रांचे शरीर निर्माण झाले. अशाप्रकारे अनंतरुपाने भगवंत या जगतात प्रगटले. या जीवप्राणिमात्रांना भरण पोषणाकरिता जल व अन्न निर्माण झाले. त्याचेच प्रतिक कलश घटपाटाच्या पूजेत जळ व अन्नाच्या रुपाने अक्षताची पूजा केलेली आहे. अक्षत् रुपाने आद्यनिरंजन भगवंतच प्रकाशमान झालेले आहेत हे भगवंता या करिता .जल अक्षत् (अन्न) रुपाने जे तुझी कलशपाटाची पूजा करतात ते जीवात्मे मुक्तिप्रत जातात. हे नारायणा! जंबुद्विपातील भारतखंडातील कुवारिका क्षेत्रावर तुम्ही अधिष्ठित व्हा. कारण ते या कलियुगाचे तुमचे आसन आहे. त्याठिकाणी आणि ज्या ज्या ठिकाणी जल व अक्षत् (अन्न) रुपाने कलश पाटाची पूजा अर्चा होते हे तुझेच प्रतिक आहे. हे जाणून सद्भक्तांना तू दर्शन दे व सद्भक्तांची मनोकामना पूर्ण कर.

   

ऋतस्य पन्थामनु तिस्त्र आगुस्त्रयो धर्मा अनु रेत आगुः।
प्रजामेका जिन्वत्यूर्जमेका राष्ट्रमेका रक्षति देवयूनाम् ॥१३॥

अथर्ववेद कांड ८ सुक्त ९ मंत्र १३

प्राणापानौ मृत्योर्मा पातं स्वाहा ॥१॥
द्यावापृथिवी उपश्रुत्या मा पातं स्वाहा ॥२॥
सूर्य चक्षुषा मा पाहि स्वाहा ॥३॥
अग्ने वैश्वानर विश्वैर्मा देवैः पाहि स्वाहा ॥४॥
विश्वम्भर विश्वेन मा भरसा पाहि स्वाहा ॥५॥

अथर्ववेद कांड २ सुक्त १६ मंत्र १ ते ५

तीन देवता १) इडा - स्तुतियोग्य भूमि म्हणजे नीति. २) सरस्वती - प्रशस्त विज्ञाननिष्ठ विद्या म्हणजे बुध्दि. ३) भारती - पोषण करणारी शक्ति अथवा विद्या. हया सर्व शक्ति सत्यशास्त्राच्या मार्गावर चालत आहेत. तीन वस्तुंची प्राप्ति करून देणारा यज्ञ (देवपूजा, संगतिकरण व दान) वीरत्वाच्या संगतीने चालत येत आहे. एक इडा प्रजेला निर्माण करते, दुसरी सरस्वती पुरुषार्थ अथवा अन्नास भरपूर करते तर तिसरी भारती दिव्यगुण प्राप्त करून देणारी धर्मात्म्यांच्या राज्याचे रक्षण करते. (१३)

प्राण आणि अपान आमचे मृत्यूपासून रक्षण करा. द्यावा-पृथ्वीच्या-श्रवणशक्तिच्या सहाय्यतेने सूर्यदर्शन शक्तीपासूनआमचे रक्षण करा. विश्वव्यापक पुरुष संपूर्ण दिव्य शक्ति द्वारा किंवा विश्वंभर ईश्वर आपल्या पोषण शक्तिद्वारा आमचे रक्षण करो. मी स्वत:ला त्यांच्या रक्षणाला समर्पीत करतो.

## मंत्र १९ वा

## कलश उपर अक्षत् तारी पगे लागवानो मंत्र.

ॐ परमकृपाळु परमात्मानी आज्ञाथी आदरु छुं, ॐ नमो श्री सद्‌गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्वामी पान फुलना भोक्ता तमे छो, आसना वासनाना भोक्ता तमे छो. घटपाटना धणी तमे छो, घटमाहे वास तमारो छे. स्वामी दाता भोक्ता तमे छो. ब्रह्मा, विष्णु, महेश्वर आद्यनारायण आद्यशक्तिरुपे घटमाहे वास पुरो. आद्यअंतना धणी तमे छो. अथर्ववेदनी कळा धरो. तमे प्रगट रूपधरो जंबुद्विपना धणी सद्‌गुरु इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

हे कलशरुप भगवंता! पान फूलाचा भोक्ता तू आहेस. सद्भक्त जी आशा आकांक्षा इच्छा कामना करतात ती पुरविणारा तूच आहे. कलशपाटाचा स्वामी तूच आहे. कलशस्थित नारायणा! या कलशात तुझेच वास्तव्य आहे. हे स्वामीन् दाता (दान करणारा) व भोक्ता (उपभोग घेणारा सुध्दा) तूच आहेस. ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, आदीनारायण व आद्यशक्ति सतपंथाचे मुख्य पंचायतन देव तुम्ही या कलशस्थित जलात वास्तव्य करा.

हे भगवंत आद्य, मध्य, अंताचा धणी तूच आहेस. तू अथर्ववेदाची कळाधारण करून प्रगट हो व या संपूर्ण जगताला दर्शन दे. मी तुला हात जोडून शिरसाष्टांग नमस्कार करतो.



यं क्रन्दसि अवतश्चस्कमाने भियसाने रोदसी अह्कयेथाम।
यस्यासौ पन्था रजसो पिमानः कस्मै देवाय हविषा विधेम ॥३॥

अथर्ववेद कांड ४ सुक्त २ मंत्र ३

प्रपथे पथामजनिष्ट पुषा प्रपथे दिवः प्रपथे पृथिव्या ।
ऊमे अभि प्रियतमे सधस्थे आच परा च चरति प्रजानन् ॥१॥
पूषेमा आशा अनु वेद सर्वाः सौ अस्मॉं अभयतमेन नेषत् ॥
स्वस्तिदा आवृणिः सर्ववीरोप्रयुच्छन् पुर एतु प्रजानन् ॥२॥

अथर्व. कांड ७ सुक्त ९ मंत्र १ - २

युध्द करणारी दोनही सेना विजय प्राप्ती व्हावी म्हणून ज्याला शरण जातात. द्युमंडळ आणि पृथ्वी भयसमयी सहाय्यता मिळण्याकरिता ज्याची प्रार्थना करतात अथवा ज्याच्या प्राप्तिचा जो मार्ग त्या मार्गाने चालण्यासाठी जी योग्यता अंगी असावी त्या देवाची पूजा करण्यास आम्ही सर्वांनी तत्पर असावे. परमेश्वर या त्रैलोक्यात सर्वच स्थानी प्रगट आहे. तो संपूर्ण भूत प्राणिमात्राची सुखदायक स्थानांची व अवस्थांची जाणिव ठेवतो. तोच भगवंत आमच्या जवळही आहे आणि फार लांबही आहे. तो सर्वांचा पोषणकर्ता आणि सर्वांना यथावत जाणतो. तोच आम्हास निर्भयतेच्या मार्गाने योग्य व सुरक्षीत रीतीने घेऊन जात असतो. तोच आमचे सर्वांचे कल्याण करणारा, सर्वांच्या ठायी वीरवृत्ती उत्पन्न करणार, सर्वांच्या उन्नतिचा मार्ग जाणणारा व त्यात कधीही प्रमाद न करणारा असा आहे. त्यासच आम्ही आमच्या सर्वांचा मार्गदर्शक मानून पूजा करीत असतो.

# मंत्र २० वा

## कलशने फूलहार चुवा चंदन चढाववानो मंत्र.

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञार्थी आदरु छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे:-

स्वामी पान फूलना भोक्ता तमे छो, स्वामी केशर कस्तुरीना भोक्ता तमे छो, स्वामी अगर चंदनना भोक्ता तमे छो, स्वामी अत्तर, अबीर, गुलाल, कंकुना भोक्ता तमे छो, स्वामी परिमल वासनाना भोक्ता तमे छो, स्वामी पान, फूल, फलनो आहार तमारो छे, स्वामी तमारो आहार व्यवहार पान, फूल, फलनो तमे लो आहार, स्वामी बलिहारी जाऊ तमारा नामपर, स्वामी तमे परमपवित्र. स्वामी तमे भाग्यविधाता स्वामी तमे इष्ट, स्वामी तमे रक्षक, स्वामी तमे सृष्टीना सृजनहार. स्वामी तमे आद्य, स्वामी तमे अंत, स्वामी तमे अवतारपात्र. स्वामी तमे श्री मत्स्य, स्वामी तमे श्री कूर्म, स्वामी तमे श्री वराह, स्वामी तमे श्री नृसिंह, स्वामी तमे श्री वामन, स्वामी तमे श्री परशुराम, स्वामी तमे श्री राम, स्वामी तमे श्री कृष्ण, स्वामी तमे श्री बौध्द, स्वामी तमे श्री निष्कलंकी नारायण, सौने दर्शन देजो, इन्द्र इमामशाह तमारा नामपर बलिहारी जाऊ, अनंत अवगुण अमारा सेवक अपराधी, तमे क्षमा करणार जांबुद्विपे कुवारीका क्षेत्रमा ऋषिवर जीवोने दर्शन देजो. स्वामी तमे कृपा करो. कळशमाहे कळा धरो. स्वामी तमे नूर स्वरूपे फुलवास माहे परवरो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम:॥

हे स्वामीन्! पान, फूलांचा तू भोक्ता आहेस. हे स्वामीन् केशर, कस्तुरीचा भोक्ता तू आहेस. अगर चंदनाचा भोक्ता सुध्दा तूच आहेस. हे भगवंता अत्तर, अबीर, गुलाल, कुंकूमाचा सुध्दा भोक्ता तू आहेस. हे कलशस्थित नारायणा! जगतातील संपूर्ण परिमल वस्तूंचा उपभोग घेणारा तू आहेस. या जगतात तूच निर्माण केलेली ही वनस्पतींची पाने नागवेलची पाने, फुले, फळे, कंदमुळे वगैरे जे काही आहेत त्या सर्वांचा उपभोग घेणारा तूच आहे. आम्ही निमित्तमात्र तुला ही पाने, फुले, फळे, कंदमुळे वाहतो, तो केवळ एक उपचार आहे. संपूर्ण चराचरसृष्टी तूच निर्माण केली असल्याने आम्हाला सुध्दा तूच निर्माण केले. आम्ही सर्वप्रजा तुझ्या नावाचा जयघोष करून तुझीच किर्ती गातो. तू परम पवित्र आहेस. संपूर्ण चराचरांचा भाग्यविधाता आहेस. तू इष्ट रक्षक सृष्टीचा निर्माता आहेस. तूच आदि, मध्य व अंति सुध्दा आहेस. निरनिराळ्या काळात परिस्थितीनुरुप अवतार धारण करून तू

या जगतात क्रिडा करतोस तूच मच्छ, कूर्म, वराह, नृसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बौध्द, निष्कलंकी नारायण, ही रुपे धारण करून आम्हा प्राणिमात्रांना उत्क्रांतिवाद शिकविलास. हे भगवंता तू आम्हाला दर्शन दे. या संपूर्ण अवतारांची जाणिव करून देणारा व सद्भक्तांना वेदगतिचे ज्ञान करून देणारा सद्गुरु इमामशाह हाच आमचा मार्गदर्शक आहे. हे भगवंता! आमच्या मार्गदर्शक गुरुत आणि तुझ्यात आम्ही अंतर मानित नाही. सद्गुरुंच्या नावावर आम्ही आपला प्राण ओवाळू. हे गुरु! आम्ही अपराधी जीवात्मे, द्वेष, मत्सर, ईर्षा, निंदा पाप वगैरे दुर्गुणांनी भरलेलो आहोत, आम्हाला क्षमा करा व पावन करा. पावन (पवित्र) करण्यास तूच एक समर्थ आहेस. जांबुद्विपात, भारतखंडात कुवारीका क्षेत्रावर या संपूर्ण ऋषिवर जीवात्म्यांना दर्शन द्या. या सद्भक्तावर कृपा करा. त्याचेच प्रतिकरुप असलेल्या आमच्या या कलश पाटाच्या ठिकाणी वास्तव्य करून आम्हाला दर्शन द्या. तुझ्या तेजस्वी स्वरूपाचे दर्शन या भक्तांना घडू द्या.



**यस्य द्यौरुर्वी पृथिवीच महि यस्याद उर्वन्तारिक्षम्।**
**यस्यासौ सूरो विततो महित्वा कस्मै देवाय हविषा विधेम ॥४॥**
**यस्य विश्वे हिमवन्तो महित्वा समुद्रे यस्यं रसामिदाहुः।**
**इमाश्च प्रदिशो यस्यं बाहु कस्मै देवाय हविषा विधेम ॥५॥**
**आपो अग्रे विश्वमावन् गर्भं दधाता अमृता ऋतज्ञाः।**
**यातु देविष्वधि देव आसित् कस्मै देवाय हविषा विधेम ॥६॥**
**हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत्।**
**स दाधार पृथिवीमुत द्यां कस्मै देवाय हविषा विधेम ॥७॥**
**आपो वत्सं जनयन्तीर्गर्भमग्रे समैरयन्।**
**तस्योत जायमानस्योल्ब आसीध्दिरण्ययः कस्मै देवाय हविषा विधेम ॥८॥**

**अथर्ववेद कांड ४ सुक्त २ मं. ४ ते ८**

ज्याच्या महिमेने द्युलोक विस्तीर्ण पावला. ही पृथ्वी विशाल बनते विस्तार पावते. ज्याच्या सत्तेने हे अंतरिक्ष लांबच लांब व विस्तीर्ण पावते. ज्याच्या सामर्थ्यबळाने सूर्य सुध्दां प्रकाशमान होतो. त्या देवाची पूजा आम्ही करीतो. (४)

ज्याच्या बळाने हिमशिखर युक्त पहाड उंचच उंच उभारलेले आहेत. प्राण्यांना राहाण्यासाठी समुद्रात भुमी तयार केली. दिशा उपदिशा ज्याच्या बाहुसमान पसरलेल्या आहेत. त्या भगवंताची आम्ही पूजा करतो. (५)

सत्यनियमाने चालणारी, जीवन देणारी, गर्भधारण करून प्रजा उत्पन्न करणारी, प्रकृतिरुप जलधारा जेव्हा विश्वाची रचना करण्यास प्रवृत्त झाली तेव्हा तिचे संचालन करणारा एक देव होता. त्या देवाची आम्ही पूजा करतो. (६)

अत्यंत तेजस्वी लोकांचा आधार सर्वप्रथम विद्यमान होता. तोच महातेजस्वी स्वरूप प्रगट होऊन पृथ्वी आदि पंचमहाभूतांचा एक पति ईश्वर झाला. त्याने पृथ्वी आणि सूर्यास धारण केले. त्या प्रजापति परमेश्वराची दिव्य गुणाकरिता आम्ही सेवा करतो. (७)

सर्व प्रथम निवासस्थान संसाराचे वा बालकरुप संसाराचे उत्पन्न करणाऱ्या जलधारांनी वा तन्मात्रांनी बालकरुप संसारास उत्पन्न केले बालकरुप संसाराचा जरायु (गर्भाचा मुख्य अंश) तेजोमय परमात्माच होता. या सुखदायक प्रजापति परमेश्वराची दिव्यगुणां करीता भक्तियुक्त सेवा करतो. (८)

# मंत्र २१ वा

## हरिअंश – वृक्ष नो मंत्र.
## कलशमा गुरुचरणामृत – तीर्थ तयार करवानो मंत्र.

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरु छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

प्रथम परमेश्वर: प्रवादे जळसागर:, सेवाने कारणे हेत रंचते, धरती उपर पाय न देतवा. सदासर्वे प्रलये गत:, प्रथम निलवर्ण ते धुंधुं:कार त्यारे स्वामी तमे आद्य निरंजन निराकार. त्या कवन चिन्ह परिवर्तन्ते? दिव्य देही ते आद्यपुरुष नारायण आप मने आप ध्यान करतवं हो स्वामीजी. तदा नूर निर्वाण आप हस्तके, तदा निरंजन ते निराकार त्या नीलवर्ण ते धुंधुं:कार. त्यारे नही साद, नही शब्द, नही उनाद, नही ॐकार, नही उत्पत, नही रेवत, नही रचना, नही पवन, नही पाणी, नही खाणी, नही वाणी, नही वेद, नही भेद, नही जळ, नही कमळ, नही वमळ, नही गर्भ, नही पर्वत, नही पाषाण, नही नदीया, नही नवाण, नही समुद्र, नही सागर, नही गिरीवर, नही कैलास, नही मेरू, नही मेखला, नही स्वर्ग, नही नर्क, नही मृत्यु, नही पाताळ, नही धरती, नही आकाश, नही चंद्र, नही सूर्य, नही तारा, नही ध्रुव, नही मेघ, नही मंडल, नही रोहिणी, नही दिवस, नही शून्य, नही गर्जना, नही जन्म, नही मरण, नही सृष्टि, नही संयोग, नही भाव, नही भेंकार, नही रुप, नही रेखा, नही राग, नही भाषा, नही दम, नही कदम, नही रीत, नही करीत, नही योग, नही युक्ति, नही शक्ति, नही भक्ति, नही मोह, नही माया, नही काम, नही काया, त्यारे भाव भेद काई न हता. तदा आद्यनिरंजने कई पेरे सृष्टि निपाई.

प्रथम निलवर्ण ते धुंध:कार, धुंधु:कार मध्ये ॐ कार, ॐ कारमाहेथी हेत धर्या, हेत थकी नीर झर्या, नीर थकी खीर कर्या, खीर थकी फीण उपाया, फीण माहेथी ईंड निपाया, ईंड थकी रंचते सर्व रंचना ईंड छेदीने त्रणभवन सरज्या हो स्वामीजी. प्रथम तो जमिननी जड बांधता युग पाच (५), पाच युग तो पियाल थोबंता (५), पाच युग तो गढ मेरू उठंता (५), पाच युग तो ब्रह्मांड जडंता (५), आठ युग तो गीत गायत्री ओचरंता (८), नव युग तो नीर नवाणु भरता (९), बार युग तो रूंडमाळा फेरवंता (१२), वीसयुग तो विभु वनस्पति वसंता (२०), त्रण युग तो त्रिभुवन त्रिशुळ धरंता (३), अेक युग तो ॐ कार बोली भणंता (१), अेवा तोंत्तेर युग (७३) ते वही गया स्वामीजीने अटकळ करतां, तदा अगम अगोचर सद्गुरू ब्रह्मा नर नारायण देव महेश्वर. ये त्रणे देवनी पूजा करे तेना आवागमनना फेरा टळे.

तदा स्वामीजिये पहेले रोप्या सत्य, सत्य उपर दत्त, दत्त उपर क्षमा, क्षमा उपर गजा, गजा उपर नील, नील उपर अनील, अनील उपर शेषनाग, शेषनागना शिर उपर धवलधोरी, धवलधोरीना शिंग उपर एकराई अेटला उपर यत्न करी स्वामीजीये सृष्टि निपाई, जे करण कल्पना अवतार पात्र ते सांभळो ऋषिवर भाई, ज्या थकी स्वामीजिये रूप धर्या ते रुप ओळखीने आज करो कमाई.

प्रथम नाम तो नील, अनील, शून्य, शान, नान, ज्ञान, म्यान, नूर, तेज, जळ, कमळ, कदंब, आदबुंद, नादबुंद, गुजतत्व, प्रेमतत्व, आद्यपुरूष आद्यपुरूषथी ॐ कार, ॐ कारथी चारे वेद प्रकाश, आद्यपुरुषथी नाभिचक्र, नाभीचक्रथी भये गुरुब्रह्मा, सद्गुरू ब्रह्माथी सकळ सृष्टिनी उत्पत्ति जे चार कल्पना अवतारपात्र ते सुणो मुनिवर भाई, ज्या थकी गुरुनरे अवतार लिधा ते अवतार ओळखीने आज करो कमाई.

प्रथम नाम तो ॐकार निरंजन निराकार. अंश तो श्री मत्स्य, अंश तो श्री कूर्म, अंश तो श्री वराह, अंश तो श्री नृसिंह, अंश तो श्री वामन, अंश तो श्री परशुराम, अंश तो श्री राम, अंश तो श्री कृष्ण, अंश तो श्री बौध्द, अंश तो श्री निष्कलंकी नारायण (पाऊळगोळी घोळवुं) अलेख निरंजन, पितांबर धारी, केशवा, माधवा, मधुसुदना, गरुडध्वज नारायणा, विष्णुदेवता निरंजना. तिस ॐ कार मधे छत्रीसजुग चौर्याशी चौकडी, प्रेमानंद, तीसमध्ये स्वामी तमे, नाद तमे, बिंब तमे, सृष्टीकरतवा तमे, भानु तमे, तीर्थ तमे,

तुज ओराधिते नीत संसारदर्शन, सतपंथ माहे जनार्दनो, चार कल्प स्थापीयो. अनंत जीव तार्यो, दर्शन पाइने परमपद पाया, श्री सद्गुरु तारणहार अमे पाम्या, वाचाबंद जे जीवे गुरु जाणिया ते जीव अमर थया. श्री सारंगधर आराधीते सुनकार लंभते. स्वामी तमे अनंत तमे, अगोचर तमे, सप्तमंडळ धारजंते स्वामी तमे चन्द्र, सूर्य, तारामंडळ, सप्तसागर, अष्टकुळ पर्वत, नवकुळ नाग, तसमध्ये स्वामी तमे, कळा धारजंते केशवंग, चौर्याशी लक्ष जीवयोनि अेक आत्मा सृष्टि करतवा, ते रुप श्री जनार्दनो. सर्व धर्म स्थाप्यो, नरपुरुष माधव, नवग्रह सत्तावीस नक्षत्र करतवा, तसमध्ये स्वामी तमे ऋषेश्वर करतवा सर्वविघ्न नास्त देवता. हंसराजा तुजविना ज्ञान श्री जनार्दननो कोन भाकीते. स्वामी तमे, धर्म तमे यक्ष मेघा किन्नर तेत्रीस करोडी देवता तमेज सत्पात्र अनाद अनंत तमे, स्वाम्मी तमे तुज न मानते ते रौरव जायते, रोह रोह जायते. तमे गुरुरुपी पारखी स्वामी तमे सकळ कळा प्रिथमी, जुगान जुगी मन संचते मन तारे नही राजा हयाने मारे लेवे ना पावे, भूत किया चोर ना कहिये, कायागड ते कारन सहज दूर, चंद्र, सूर्य, पुरुष उपकार, उत्तर दक्षिण पूर्व पश्चिम रोह रोह वानीया. अेणीसेवा कबुल करतवा ते नर अमरापुरी वासा. घटे ब्रह्मा, घटे विष्णु, घटे देव महेश्वर अे ध्यान धारयते सतपंथ सदा उत्तम, कळस मध्ये कळाधरी अलेख निरंजन. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

अथांग अशा या विश्वब्रह्मांडात क्रिडा करण्यासाठी निरनिराळ्या प्राणिमात्रांची वेगवेगळी रुपे धारण केली पण त्या आधी भगवंताचे स्वरूप कसे होते? अनंत अशा अवकाशात स्वयंतेजोरुप परमात्मा आपल्याच ध्यानात मग्न असून संकल्परुपाने त्याने एक अविद्या रुप तयार केली. त्या विश्व ब्रह्मांडात संकल्पमात्राने त्या योगमायेने सृष्टि निर्माण केली. त्या सृष्टीवर पाय सुध्दा देता येणार नाही अशा प्रकारची अत्यंत धगधगीत अग्नीरुप ही सृष्टि होती. संपूर्ण शून्याकार महदाकाशात धगधगत्या सृष्टीवर कित्येक वर्षेपर्यंत अनहद वृष्टि झाली. ही वृष्टी त्या योगमायेने पंचमहाभूते निर्माण करून केली. आकाश, तेज, वायु व जल या चार महाभूतांच्या संयोगाने ही वृष्टि झाली. अनंत काळापर्यंत होत असलेल्या या वृष्टीच्या संयोगाने एक प्रकारचे कवच निर्माण केले. आकाशाच्या आतील थरात तेज, त्याच्या आतील थरात वायु व त्याच्या आतील थरात जल अशा प्रकारे चारही बाजूने हे थर बांधून योगमायेने या थरांच्या आत गुरुत्वार्षण निर्माण करून स्थिर केले व त्याच्या आत ही सृष्टि (पृथिवी) निर्माण झाली. या सृष्टीच्या पृथ्वीच्या कवचावर जलधारांची वृष्टी अनहद रीतीने झाली. त्यायोगाने पृथ्वीच्या वरचे कवच थोडे थोडे निवत गेले. अशा परिस्थितीत पृथ्वीवर काय होते? ॐ कार नव्हता, त्यामुळे शब्द नव्हता, साद प्रतिसाद नव्हता, अनहद नाद नव्हता, उत्पत्ति नव्हती, स्थिती नव्हती, लय नव्हता, कोणतीही रचना नव्हती, वायु नव्हता, चार खाणी नव्हत्या,

चार वाणी सुध्दा नव्हत्या, वेद नव्हते, त्यामुळे भेद नव्हते, जीवनदान देणारे पाणी नव्हते, त्यामुळे कमळ नव्हते, स्त्री पुरुष नव्हते त्यामुळे गर्भ नव्हता, पर्वत पाषाण शिखरे नव्हती, नद्या नव्हत्या, त्यामुळे सागर सुध्दा नव्हते, गिरीवर, कैलास, मेरु, सुमेरु नव्हते, त्यामुळे स्वर्ग नव्हता, नर्क नव्हता, मृत्यु नव्हता, पाताळ नव्हते, पृथ्वी (जमिन) नव्हती, आकाश नव्हते अवकाश नव्हते, चंद्र नव्हता, सूर्य नव्हता, तारांगण नव्हते, ग्रह नव्हते, धृव सुध्दा नव्हता. मेघ नव्हता मंडल नव्हते, रात्र नव्हती, दिवसही नव्हता, कसलाही आवाज नव्हता, गर्जना नव्हती, जन्म नव्हता, मरणही नव्हते, संयोग नव्हता, वियोगही नव्हता, भावही नव्हता, महाभयंकर रुपही नव्हते. रूप नव्हते, रेखासुध्दा नव्हती. राग नव्हता, आलापभाषा सुध्दा नव्हती. दम नव्हता, कदम नव्हता, रीत नव्हती कर्मसुध्दा नव्हते, योग नव्हता युक्ति नव्हती, भक्ति नव्हती मुक्ति सुध्दा नव्हती. मोह नव्हता, माया नव्हती, काम नव्हता काया नव्हती. भाव भेद वगैरे काहीही नव्हते तेव्हा आद्यनिरंजन निराकार ईश्वराने ही सृष्टि कशी निर्माण केली.

प्रथम निलवर्ण धुंधु:कार त्यामधून ॐ कार, ॐ कारामधून संकल्पमात्राने मनात हेतु धारण करून जल निर्माण केले. जलामधून क्षीरासारखी दुधासारखा फेस निर्माण झाला. अनंत काळात जलवृष्टी होऊन फेस पक्का जमला त्याचे कवच निर्माण झाले. त्याचे प्रस्थर भंग पावून अंडाकृति गोळा झाला. त्या गोळ्यात योगमायेने वेगवेगळ्या रचना केल्या. त्याचे एक ब्रह्मांड होऊन त्याचे तीन भाग पाडले. त्यात पाताळ, मृत्यू आणि स्वर्गलोक निर्माण झाले.

सर्वप्रथम जमिनीची जड बांधतांना ५ युगे लागली. ५ युग पाताळाची रचना करतांना लागले. ५ युग पृथ्वीतलावर निरनिराळे गिरीवर पर्वत मेरु सुमेरुची रचना करतांना लागले. ५ युग ब्रह्मांडाची रचना करतांना लागले. ८ युगे ॐ काराचे गायन करतांना व्यतीत झाले, ९ युगे महासागर, समुद्र नद्या यात जल भरतांना लागले. १२ युग वेगवेगळी चित्रविचित्र प्राणिज सृष्टी निर्माण करण्यास लागले. २० युग अठराभार वनस्पती व त्यांची बीजे तयार करण्यास लागले. ३ युगे त्रिभुवन निर्माण करण्यास लागले. १ युग ॐ चा जाप करण्यास लागला. अशाप्रकारे त्र्याहात्तर युगे केवळ सृष्टी रचना करण्यास लागली. सद्गुरु ब्रह्मा, नरनारायण आणि देव महेश्वर यांची जे पूजा करतात त्यांचे आवागमनाचे फेरे मिटतात.

सत् चित् आनंद स्वरूप भगवंताचे मुळ सत् होय म्हणून विश्वविराट् रुप वृक्षाचे मूळ सत् आहे. सत्यापासून दत्त, दत्तापासून (भगवंताचे उदार अंत:करणाने योगमायेला हे स्वरूप दान केले म्हणून तीला दिलेले रुप दत्त) क्षमा हे धर्माचे मूळ आहे. सत्य, दान, क्षमा हे तीनही धर्माचे मूळ आहे. त्या मुलाधारावर गज म्हणजे अतिविशाळरुप निल वर्णाने युक्त असे झाले. त्यावर अनिल त्यावर अनल अग्नि, त्यावर शेषनाग, शेषनागाच्या शिरावर धवल धोरी, धवलनंदीच्या शिंगावर एक राई. ती राई म्हणजेच ही सृष्टी होय. या एक राईस्वरूप सृष्टीत भगवंताने अनेकानेक रचना करून सृष्टी निर्माण केली. भगवंताने योगमायेच्या साह्याने ही संपूर्ण चराचर सृष्टी निर्माण केली त्यात प्रथम दशरायण, दुसरे देवगुण व तिसरे पंखला

कल्प निर्माण केले. त्यात अनुक्रमे यक्ष, मेघा व किन्नर देव निर्माण झाले. तदनंतर चौथ्या करण कल्पात चार युगे, सत्य, त्रेता, द्वापार व कलियुग निर्माण झाले. प्रत्येक कल्पाच्या अंति साधा प्रलयकाळ होतो. त्याला प्राकृतिक प्रलय म्हणतात. करण कल्पाच्या सुरुवातीस भगवंताने योगमायेच्या साह्याने जड व चित् सृष्टी निर्माण करून जीव प्राणिमात्र निर्मिले. त्यांचे आचार विचार धर्म नेमले. युगधर्मप्रणालीनुसार आचार विचार धर्मात परिवर्तन घडविण्याकरितां वेगवेगळे अवतार धारण केले व युगधर्माची स्थापना करून जगताला त्या धर्ममार्गाचे दिग्दर्शन केले. सृष्टीच्या अंतापर्यंतचा युगधर्म दाखवून जनतेला धर्म शिकविला. हा युगधर्म शिकविण्याकरीता भगवंताने कोणकोणती रुपे धारण केली ?

प्रथम निल, अनिल, शून्य, शान, नान, ज्ञान, म्यान, नूर, तेज, जळ, कमळ, कदंब, आदबुंद, नादबुंद, गुजतत्व, प्रेमतत्व आद्यपुरुष, ॐकार, चारवेद. आद्यपुरुषाच्या नाभीचक्रामधून कमळ, कमळ पाकळीत ब्रह्मस्वरूप सद्गुरु, सद्गुरुब्रह्मा व योगमाया सवितृस्वरूप सावित्री यांच्या पासून शबलब्रह्म व त्यापासून सृष्टीचीनिर्मिती, प्राणिमात्रांची व मनुष्यमात्राची निर्मिती स्मरणभोग, प्रेमभोग, स्पर्शभोगाने व मैथुनभोगाने झाली. सद्गुरुब्रह्मा व गायत्री शक्ति यांच्या साहाय्याने नाभीचक्राचे ज्ञान प्राप्त होऊन जीवात्मा मुक्तिप्रद जातो.

प्रथम ॐकार निरंजन निराकार, त्याचा अंश मत्स्य, त्याचाच अंश कूर्म, त्याचाच अंश वराह, तोच नृसिंह, तोच वामन, तोच परशुराम, तोच राम, तोच कृष्ण, तोच बौध्द व तोच भगवान निष्कलंकी नारायण. सद्गुरु ब्रह्मा (येथे पाऊळगोळी घटातील तीर्थजलात घोळवावी) तुम्ही घटामध्ये वास्तव्य करा.

हे अलक्ष्य निरंजन भगवंता, पितांबर धारण केलेला शंख, चक्र, गदा पद्म ही आयुधे धारण करणारा, केशी, मधु आदि दैत्यांचा नाश करणारा, गरुडध्वज नारायणा, विष्णुदेवता निरंजना ॐकार स्वरूपा, नादस्वरूप, बिंदुस्वरूप तू आहेस. जगत प्रकाशक भानु तू आहेस, जगतातील संपूर्ण तीर्थांचे तीर्थजल या घटात वास्तव्य करो. संसारसागरात सतपंथ तत्वदर्शनाप्रमाणे वागल्यास जीवात्मा, अनंत कालापासून फिरत असला तरी गुरुमार्ग दर्शनाने अमर होतो. ज्याने सप्तमंडल धारण केले, चंद्र, सूर्य, तारामंडळ, सप्त उर्ध्वलोक, सप्त पाताळ, सप्तसागर अष्टकुळ पर्वत, नवकुळ नाग धारण केलेले आहे अशा भगवंता तूच ते चराचर विश्व व्यापलेले आहेस. सर्व धर्म प्राणिमात्रांचे नियत धर्म, मानवमात्राचे वर्णधर्म व ज्ञानप्राप्ति करवून मोक्षाप्रत घेऊन जाणारा धर्म हे भगवंता तूच नियत केलेला आहे. प्राणिमात्रावर आलेले वेगवेगळ्या विकारांचे संकट व पुढेही येणारे प्राकृतिक संकट तूच निवारण करतोस. हे हंसराज भगवंता! प्राणिमात्रांना व मानवमात्रांना ज्ञान देणारा तूच एक समर्थ आहे. अनेकानेक कल्पामध्ये यक्ष, मेघ, किन्नर, मानव यांचा तू उध्दार केला. हे भगवंता नारायणा! तुला न मानणारा जीव अनंत दुःख भोगून शेवटी नरकाची प्राप्ति करून घेतो. या कायानगरीत मन हाच राजा तू बसविला आहे. त्याच्या स्वाधीन हे दशेंद्रियांचे सारथ्य दिलेले आहे. आत्मा या सर्व रथास

जरी चालविणारा असला तरी इंद्रियरुप घोडे मनाच्या स्वाधीन आहे. ते मन या इंद्रियास जसे चालविल उंचनिच खोल खड्डा, नितीमार्गाने जसे चालविल तसे इंद्रिये चालतात व त्यायोगाने पापपुण्य घडून जीवात्म्याची सद्गती दुर्गती होते. म्हणून या मनाचे दमन करणे, मन स्थिर ठेवणे हे जीवात्म्याचे प्रथम कर्तव्य आहे. हे मन अभ्यास व वैराग्याने स्थिरावते म्हणून वेदगतीचे ज्ञान प्राप्त करावे. हे ज्ञान अथर्ववेद आपणास शिकवतो. म्हणून अथर्ववेदाच्या तत्वाप्रमाणे वागावे हा संपूर्ण मंत्राचा सार आहे. याच मंत्रांच्या अभ्यासाने कित्येक जीवात्म्यांचा उध्दार झाला, होत आहे व पुढेही होणार आहे. म्हणून ह्या मंत्रानीयुक्त तृप्त झालेले हे कळशातील तीर्थजल आपले सर्व संकल्प पूर्ण करतात. म्हणून सत्पंथ कलश घटपाट पूजा विशेष रितीने इमामशाहांनी दिग्दर्शीत केलेली आहे.



दिशो ज्योतिष्मतीरभ्यावर्ते ता मे द्रविणं यच्छन्तु तामे ब्राह्मणवर्चसम् ॥३८॥
सप्तऋषीनभ्यावर्ते ते मे द्रविणं यच्छन्तु ते मे ब्राह्मणवर्चसम् ॥३९॥
ब्रह्माभ्यावर्ते तन्मे द्रविणं यच्छन्तु तन्मे ब्राह्मणवर्चसम् ॥४०॥
ब्राह्मणाँ अभ्यावर्ते तेमे द्रविणं यच्छन्तु ते मे ब्राह्मणवर्चसम् ॥४१॥

अथर्ववेद कांड १० सुक्त ५ मंत्र ३८ ते ४१

प्रकाशरुप दिशांच्या बाजूने मी प्रदक्षिणा घालतो, त्या दिशा मला शरीरबल, द्रव्यबल व शक्तिबल देवो व ते मला ब्रह्मज्ञानाचा प्रताप देवो सात व्यापनशिल अथवा दर्शनशिल ऋषीना मी प्रदक्षिणा घालतो हे सप्तऋषी आपल्या शरीरात, त्वचा, नेत्र, कान, जिव्हा नाक, मन व बुध्दि वसलेले आहेत. अथवा दोन कान, दोन नाकपुडया, दोन डोळे व मुख हे होत यांच्या सभोवार मी प्रदक्षिणा घालतो कारण ते मला बल व ब्रह्मज्ञानाचा प्रताप देवो. संपूर्ण तेजस्वरूप प्रकाशमान ब्रह्माला मी प्रदक्षिणा घालतो ते ब्रह्मा मला बल आणि ब्रह्मज्ञानाचा प्रताप मला देवो. मी ब्रह्मज्ञानी ब्राह्मणांना प्रदक्षिणा घालतो. ते मला बल व ब्रह्मज्ञानाचा प्रताप देवो.

# मंत्र २२ वा

## कलशने प्रदक्षिणा फेरवानो मंत्र.

**ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरू छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सदगुरू पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-**

श्री ब्रह्मावाचा, श्री विष्णुवाचा, श्री महेश वाचा, श्री आद्यनारायण वाचा, श्री आद्यशक्तिवाचा, श्री मत्स्यवाचा, श्री कूर्मवाचा, श्री वराहवाचा, श्री नृसिंहवाचा, श्री वामन वाचा, श्री परशुराम वाचा, श्री राम वाचा, श्री कृष्णवाचा, श्री बौध्द वाचा, श्री निष्कलंकी नारायणनी वाचाये जो प्रदक्षिणा करीने पुजीये घट ने पाट तो सोहेली थाये अमरापुरनी वाट, सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः ॥

सद्गुरु ब्रह्माच्या वाचेने मी कलशाला प्रदक्षिणा घालीत आहे ती हे भगवंता तुम्ही स्विकारावी. श्री विष्णुच्या वाचेने मी या घटपाटाला प्रदक्षिणा घालीत आहे ती तुम्ही स्विकारावी, श्री महेश्वराच्या वाचेने, श्री आद्यनारायणाच्या वाचेने, श्री आद्यशक्तिच्या वाचेने, श्री मत्स्याच्या वाचेने, श्री कूर्माच्या वाचेने, श्री वराहाच्या वाचेने, श्री नृसिंहाच्या वाचेने, श्री वामनाच्या वाचेने, श्री परशुरामाच्या वाचेने, श्री रामाच्या वाचेने, श्री कृष्णाच्या वाचेने, श्री बुध्दाच्या वाचेने, श्री निष्कलंकी नारायणाच्या वाचेने मी ही कलशरुप भगवंताला प्रदक्षिणा घालीत आहे ती तुम्ही स्विकारावी व आम्हाला बळ व ब्रह्मज्ञान देऊन मोक्षगतीचे ज्ञान द्यावे.



ये ३ स्यां स्थोदिच्या दिशी प्रविध्यन्तो नाम देवास्तेषां वो वात इषवः !
तेनो मृडत ते नोऽधि ब्रूत तेभ्यो वो नमस्तेभ्यो वः स्वाहा ॥४॥

अथर्ववेद कांड ३ सुक्त २६ मंत्र ४

हे भगवंता! जो तू या उत्तर दिशेकडे वेध करणारा (लक्ष्यपूर्वक दृष्टी देणारा) या नावाचा देव आहे. तुझा बाण वायु आहे तो देव आम्हाला सुखी करो आणि उपदेश करो. तुझ्या करीता आमचे नमन व समर्पण हो.

## मंत्र २३ वा

## कलशने उत्तर दिशाये छाट दई उदक मुकवानो मंत्र.
## (उत्तर दिशाना देव देवताओने आवाहन करवानो मंत्र.)

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरु छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

उत्तर, दक्षिण, पूर्व, पश्चिम, चार खाण, चार वाण, चार वेद, पंच देव, सप्तऋषि, चौद ब्रह्मांड दश अवतार, ब्रह्मा, विष्णु, महेश्वरना कुळ कायमनो परिवार. स्वामी तमे कलशमाहे कळा धरो, घटमाहे तमारो वास करो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः ॥

हे भगवंता! तू सदैव कृपाळू आहे. आम्ही हात जोडून नमन करतो व आम्हाला तुझ्याच चरणी समर्पण करतो. आम्हाला तू सुखी अन्नधनाने समृध्द कर व तुझ्या अनंत ज्ञानाचा उपदेश कर. या घटाच्या उत्तरेकडे बसलेल्या सर्व देवी आणि देव आमच्या या तीर्थजलाच्या आहूतीने प्रगट होऊन आम्हा अज्ञ बालकांना दर्शन द्या. चारही खाणी निर्माण करणारा विधाता, पींडामध्ये चारही वाणी निर्माण करणारा वायुदेव, चार वेद जेथून प्रकाशीत झाले तो पीतामह ब्रह्मा, विष्णु, महेश, आद्यशक्ति, आद्यनारायण या अथर्ववेदान्तर्गत पंचदेव, पुलह, क्रतु, अत्री, पुलस्त, अंगीरा, मरिची, अरुंधतीसह वसिष्ठ हे सप्तऋषि, चौदा ब्रह्मांड दहा अवतार, ब्रह्मा, विष्णु, महेशाचा कुळपरिवार (ब्रह्मवेत्तेमहापुरुष, विष्णुचे दूत व महेशाचे संपूर्ण गण हाच त्यांचा परिवार आहे.) तुम्ही सर्व देवगण आपापल्या अंशाने या कलशात वास्तव्य करा आम्ही तुम्हाला अत्यंत आग्रहाने आमंत्रीत करीतो आपण यावे व आम्हाला सुखी समृध्द करावे व आमचे संरक्षण करावे.



ये ३स्यां स्थ प्रांच्या दिशी हेतयो नाम देवास्तेषां वो अग्निरिषव:।
ते नो मृडत ते नोऽधि ब्रूत तेभ्यो वे नमस्तेभ्यो व: स्वाहा ॥१॥

**अथर्ववेद कांड ३ सुक्त २६ मंत्र १**

हे ईश्वरा! तू पूर्व दिशेकडे वज्र नावाचा देव आहेस. तुझा बाण अग्नी आहे. अशा भगवंता तू आम्हाला सुखी कर. अन्नधनाने समृध्द कर. आम्हाला योग्य मार्गदर्शन करून उपदेश कर. आम्ही तुला नमन करतो व तुझ्याच चरणी समर्पण करतो.

# मंत्र २४ वा

## पूर्व दिशाना देव देवताओने आवाहन करवानो मंत्र.

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरू छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा, इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे:-

धरती आकाश पवनपाणी, अढारभार वनस्पती, अेकवीस ब्रह्मांड, सातद्वीप, सातसागर, नवसो नव्वाणु नदीयो, अष्टकुळ पर्वत नवकुळ नाग, बारकुळ मेघ, दश दिशा दशमो अवतार स्वामी तमे कळशमाहे कळा धरो घटमाहे तमारो वास करो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम:॥

या धरतीतलावर असणारे देव, आकाशात वसलेले देवगण, वायुदेव, वरुणदेव जलदेवता, अठराभार वनस्पति, अेकवीस ब्रह्मांड चालक देव, नवखंड सप्तद्विप मंडीत पृथ्वी, नऊशेनव्वाणु नदी, अष्टकुळ पर्वत, नवकुळ नाग, बारकुल मेघ दाहीदिशा, दशम श्री निष्कलंकी अवतार, हे भगवंता! पूर्व दिशेकडील वसलेले सारे देव देवतागण आपण आमचे आमंत्रण स्विकारावे व या कलशपूजेच्या समयी येऊन आम्हाला ज्ञानाचा उपदेश करावा आम्हाला सुखी करावे आम्ही तुम्हाला नमन करतो आणि समर्पण करतो.

ये ३स्यां स्थ दक्षिणायां दिश्य विष्यवो नाम देवास्तेषां वः काम इषवः।
ते नो मृडत ते नोऽधि ब्रूत तेभ्यो वो नमस्तेभ्यो वः स्वाहा ॥२॥

अथर्ववेद कांड ३ सुक्त २६ मंत्र २

हे ईश्वरा! जो तू दक्षिण दिशेकडून येणाऱ्या संकटातून आमचे रक्षण करणारा परमात्मा आहेस, त्या तुझ्या बाण काम आहे तू आम्हाला सुखी कर. अन्नधनाने समृध्द कर. तुला आमचे नमन असो व तुलाच आम्ही समर्पण सुध्दा आहे.

# मंत्र २५ वा

## दक्षिण दिशाना देव देवताओने आवाहन करवानो मंत्र.

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरुं छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्‌गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

सीता, कुंता, तारा, द्रौपदी, कनकाशक्ति, तुळजादेवी, रुक्ष्मिणी, शक्तिमाता, योगमाया, अलख निरंजन संसार निपाया, अठ्यायशी सहस्त्र ऋषि, सोळ करोड कुळ परिवार, छत्रीस करोड कुळ परिवार, नव्वाणु करोड यक्ष कुळ परिवार, छप्पन्न करोड मेघा कुळ परिवार, बत्रीस करोड किन्नर कुळ परिवार, तेत्रीस करोडी देवता, अनंत करोडीना तारणहार स्वामी तमे कलशमाहे कळा धरो घटमाहे तमारो वासो करो. सद्‌गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः ॥

हे शक्तिस्वरूप भगवंता! सीता, कुंता, तारामति, द्रौपदी, कनकाशक्ति (रेणुकादेवी) तुळजाशक्ति, रूक्ष्मिणी, शक्तिमाता योगमायेच्या साह्याने अलक्ष्य निरंजनाने ह्या संसाराची रचना घडवून आणली ते सर्व देवदेवता या कलश घटपाटाच्या दक्षिणेकडून आमचे संरक्षण करो. अठ्यायशी सहस्त्र ऋषिवरगण सोळा करोडी कुळपरिवारासह छत्रीस करोड कुळपरिवारासह, नव्वाणु करोड यक्ष कुळ परिवारासह, छप्पन्न करोड मेघा कुळ परिवारासह, बत्रीस करोड किन्नर कुळ परिवारासह तेत्रीस करोड देवागणासह तुम्ही या कलशघटपाटाच्या दक्षिण दिशेकडून संरक्षण करो. घटामध्ये तुमचे वास्तव्य राहो.



ये ३ स्थां स्थ प्रतीच्या दिशी वैराजा नाम देवास्तेषां व आप इषवः।
ते नो मृडत ते नोऽधि ब्रूत तेभ्यो वो नमस्तेभ्यो वः स्वाहा ।३॥
अथर्ववेद कांड ३ सुक्त २६ मंत्र ३

हे सत्चित्स्वरूप नारायणा! जो तू या पश्चिम दिशेकडील विराजमान देव आहे, तुमचा जल हा बाण आहे, तुम्ही आम्हाला सुखी करा व अन्नधनाने समृध्द करा. तुम्हाला आम्ही नमन करतो व तुमच्या चरणी आम्ही समर्पण करतो.

# मंत्र २६ वा

## पश्चिम दिशाना देव-देवताओने आवाहन करवानो मंत्र.

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरू छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे:-

चन्द्रमा, सुर्य, नवलाख तारा, सप्तऋषी निरंजन निराकार सात असमान वैकुंठद्वार, कहे सद्गुरु ब्रह्मा, सतपंथ सदा उत्तम. मुक्तिमार्ग भेदंते ब्रह्मद्वार. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः॥

हे निर्गुण निराकार ईश्वर! तू अत्यंत प्रकाशमान चन्द्र आहेस, सूर्य आहेस, नऊ लाख तारांगण, सप्तऋषि दैदिप्यमान अग्नी, विद्युल्लता आहेस तू आपापल्या अंशाने प्रगट होऊन या कलशाठिकाणी पश्चिम बाजूने वास्तव्य करावे. सप्त उर्ध्वलोक, द्युमंडळ, वैकुंठद्वार तुझ्या तेजोरुप प्रकाशाने प्रकाशित होवो. सतपंथ सदैव उत्तम आणि श्रेष्ठ आहे. मुक्तिप्रत घेऊन जाणारे ब्रह्माचे द्वारच आहे. आम्ही तुझीच उपासना, पूजा करतो. तू आम्हाला बळ दे आम्ही तुलाच नमस्कार करतो.

❋ ❋ ❋ ❋

ये ३ स्थां स्थ ध्रुवाया दिशी निलिम्पा नाम देवास्तेषा वः ओषधीरिषवः।
ते नो मृडत ते नोऽधि ब्रूत तेभ्यो वो नमस्तेभ्यो वः स्वाहा ॥५॥
ये ३ स्थां स्थोर्ध्वायां दिश्यवस्वन्तो नाम देवास्तेषां वो बृहस्पतिरिषवः।
ते नो मृडत ते नोऽधि ब्रूत तेभ्यो वो नमस्तेभ्यो वः स्वाहा ॥६॥
अथर्ववेद कांड ३ सुक्त २६ मंत्र ५/६

हे भगवन्! जो तू या स्थिर झालेल्या कलशात दहाही बाजूंनी वेगवेगळ्या देवी देवतांच्या रूपाने वास्तव्य करीत आहेस. त्या आम्हा सद्भक्तांना औषधी रूपाने संरक्षण दे. तुम्ही विजय प्राप्त करून देणारे वीर आहात, तुमचा बाण अन्न, सोमलतादि औषधी असून तुम्ही आम्हाला सुखी करा, आपल्या अधिकार वाणीने आम्हाला उपदेश करा व अन्नधनाने समृध्द करा. आम्ही तुम्हाला नमन करतो व आमचे जीवन तुमच्या करितां समर्पित होवो. (५)

जो तू उर्ध्व व अधः दिशेने भक्तांचे रक्षण करणारे देवतास्वरूप आहे तुम्ही संरक्षणाचे अधिकारी रुपाने राहून आम्हाला सुखी करा. तुम्हा सर्वांचा मुख्य सेनापती बृहस्पती असून त्याचा बाण सर्व दिशांनी भक्तांचे रक्षण करणे हा आहे. तुम्ही आम्हाला उपदेश करून अन्नधनाने समृध्द करा आम्ही तुम्हाला नमन करतो व आमचे जीवन तुमच्याकरितां समर्पित करतो.(६)

# मंत्र २७ वा

## कलशने दशे दिशाअे छाट नाखी पगे लागवानो मंत्र.

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरु छुं, ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

ॐ कार बिंबाकार, महाकार, भुमाकार, निरंजन निराकार आद्यचतुर रोप्या स्तंभ तळे मांडया पाटने उपरकुंभ, कुंभमाहे बेठी मूरतचार, माहे निरंजन निराकार. चार पुरुषने अेकजनार, माहे सात प्रदक्षिणानो आचार, प्रदक्षिणानुं मोटु दान. पुजीये तो मेरुसमान करी प्रणामने नाखीये छाट, धरती असमान रह्या अेक सत्य समान चतुर दिशाने खुणा चार, खगोल, भुगोल सौ विस्तार, सत्यसंतोष ईंड आकार, ईंड थकी रच्यो संसार, कुंभे नुर कलशनो भेद. यज्ञ स्थाप्यो अजामेध, अथर्ववेदे पुरो साक्ष फेरा टाळो चौर्याशीलाख, थाळ विश्वंभरा भोजन, अेक मूरत त्रण देवमळी सृष्टि ज्या स्थापी, आद्य सतपंथ स्थाप्याने पाप नाख्या कापी. आशा पुरो, वास करो, नुरनो प्रकाश करो, कलशमाहे कळा धरो, ऋषीवर जीवोने पावन करो, निरंजन निष्कलंकी रुप, तमो सकळ सृष्टीना भूप, सद्गुरुये किधी महेर, वधार्या धर्मने टाळ्या कहेर, सद्गुरु निरंजननी काया, स्वामी तमथी उपन्या तममाहे समाया. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः॥

हे स्वामी! तू ॐकार स्वरूप आहेस. संपूर्ण जगत हे तुझे प्रतिबींब स्वरूप आहे. तू महदआकार आहेस, तू भुमाकार स्वरूप आहेस, निरंजन निराकार आहे. ह्या सृष्टीची रचना करतांना सर्वप्रथम तू चार स्तंभांची योजना केली ते चार स्तंभ म्हणजे दान, दया, तपश्चर्या व शुचिर्भूतपणा. या धर्मरुपी अधिष्ठानावर कलश भगवान स्थित आहे. या कुंभात चतुर्मूर्ति नारायण वसलेला आहे. तो निरंजन निराकार आहे. त्याच भगवंताचे हे चार स्वरूप आहे आद्यनारायण (शेषशाईनारायण), ब्रह्मा, विष्णु, व महेश्वर असून त्या सर्वांची शक्ति वेगवेगळ्या गुणांनी विभागलेली असली तरी ती एकच आहे. म्हणून चतुरपुरुष आणि एकच स्त्री असे म्हटलेले आहे. त्यांच्या पासून या जगताची उत्पत्ति, स्थिती व लय होत असते. या कलशरुप भगवंताला मी सात प्रदक्षिणा घालतो. ते माझे सप्त दोष निवारण करोत, काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, द्वेष हे सर्व दोष माझ्यामधून निघावे व मी निर्मल, शुध्द, पवित्र व्हावे. परिक्रमा करण्याचे फार मोठे पुण्य आहे. मेरु पर्वताची उंची ज्याप्रमाणे समजू शकत नाही त्याप्रमाणे त्याच्या पुण्याची गणती सुध्दा करता येत नाही. संपूर्ण चराचर व्यापी देवीदेवतांच्या कलशस्थित तीर्थजलाने छाट दिला तर (ती एकप्रकारची आहूती तयार होते.) त्यायोगे पृथ्वीतलावरील देव, आकाशातील देव, चार दिशेकडील देव, चार उपदिशाकडील देव, उर्ध्व व अधः दिशातील देव यांना या आहुती जलाने छाट दिला तर सर्व देवांना तो पोहोचतो तद्वत आपण जो नैवेद्य भगवंताला या देवतांच्या मुखाने अर्पण करतो तो त्या त्या देवतांना पोहोचतो. भगवंत वा देवता आपण त्यांना जो नैवेद्य समर्पित करतो त्याचे ते भुकेले नसतात. पण आपण ज्या भावनेतून अर्पण करतो त्या भावनेचे ते भुकेले असतात. या जगतात युगधर्माप्रमाणे पूजा अर्चा होम यज्ञयाग होत आलेले आहेत व परंपरेने पुढे होतही राहतील. सत्ययुगाच्या युगधर्माप्रमाणे कुंजरमेध यज्ञ, म्ह. हत्तीचा यज्ञ, सर्वश्रेष्ठ मानला जात असे, त्रेतायुगात अश्वमेध यज्ञ हा श्रेष्ठ मानला गेला, द्वापारयुगात गोमेध यज्ञ श्रेष्ठ तर कलियुगात अजामेध श्रेष्ठ मानला गेलेला आहे. (कुंजर, अश्व, गो, आणि अजा हे चारही प्राणी आहेत. यज्ञसंस्था जेव्हा पासून अस्तित्वात आली तेव्हापासून म्हणजेच अनादि काळापासून मानवमात्राला सुखी करण्याकरितां ऋषीमुनींनी हे यज्ञ सुरु केले. उद्देश हा की यज्ञाच्या आहुतींनी अग्नीदेवता प्रसन्न होऊन अनेकानेक देवदेवतांना आपापला हविर्भाग पोहोचवून त्या देवतांना प्रसन्न करून घेऊन मनुष्य, बळ अन्नधन व संरक्षण प्राप्त करून घेत असतो. म्हणून त्या त्या देवतांच्या नावाने आहुती, हवन केले जात असे. यज्ञीय पशुला उभे करून त्याच्या एकेक अवयवांना स्पर्श करून त्यानावाने म्हणजे पशुमाध्यम कल्पून मनुष्याच्या अवयवांना स्पर्श करून त्या नावाने आहूती दिल्या जात असत म्हणजे त्या अवयवात वसलेली देवता प्रसन्न होऊन मनुष्याला बल शक्ति व संरक्षण देते या भावनेतून हे होम हवन होत असे. मध्यंतरीच्या काळात त्याचा विपरीत अर्थ करून जिव्हालौल्या करिता मांसाशन सुरु झाले. ह्या विपरीत अर्थाने लोक घृणास्पद रीतीने जीव हिंसेकडे वळले व यज्ञसंस्था बंद होऊ लागल्या. सद्गुरु इमामशहांच्या मते कुंजर अश्व, गो, आणि अजा हे सर्व प्राणी नसून

इंद्रियांचे द्योतक आहेत. पंचेन्द्रिये दमन करून मनोविजय मिळविला तर मनुष्यजीवन सुखी व समृध्द होते म्हणून ते बळ प्राप्त करण्यांकरिता कलश घटपाटाची पूजा इमामशाहांनी स्विकारली. शास्त्रकारांनी कित्येक ठिकाणी म्हटले आहे की क्रमशः या पशुंच्या किंमती एवढे दान करावे. आपण जमविलेल्या संपत्तितून ठराविक वेळेस दान करायचे असेल तर त्या पशुच्या किमती एवढे दान केल्याने मनुष्य सुखी होतो.) या यज्ञांच्या द्वारा आहुती दिल्यानंतर संपूर्ण देवदेवता प्रसन्न होऊन तृप्त होतात, संपूर्ण विश्वचालक देवता प्रसन्न झाल्या म्हणजे मनुष्याच्या इच्छित मनोकामना त्या देवता पूर्ण करतात. विश्वातील तीनही देवांनी मिळून ही सृष्टि निर्माण केलेली आहे. सर्वप्रथम त्यांनी सत्यमार्गाची स्थापना करून मनुष्याला जीवन जगण्याचे धडे शिकविले. पाप काय आणि पुण्य कशास म्हणावे याचा निवाडा करून ज्ञान शिकविले. त्याप्रमाणे मनुष्य जीवन सुरळीत सुरु झाले. भगवंता या भक्तांची आशा आकांक्षा पूर्ण करा, तेजाचा प्रकाश या सद्भक्तांच्या हृदयात उदीत करा. या कळशा ठिकाणी तुम्ही अनंत चैतन्य स्वरूपाने कळा धारण करा. या तुझ्या सद्भक्त ऋषीवर मुनिवराला पावन करा. हे निरंजन निष्कलंकी नारायणा! तू संपूर्ण चराचर भूत प्राणिमात्रांचा चैतन्यदायक चालक आहे. आम्ही तुझीच उपासना करणारे आज्ञांकित सेवक आहोत. हा देह तूच आम्हाला दिला आहे. ह्या देहाने जेवढी शक्य असेल तेवढी तुझी उपासना करू, पण सत्य हेच आहे की हा देह तुझा आहे. तूच याला चालविणारा बळ देणारा आहे व अंति तुझ्यातच येऊन मिळणारा आहे.



यस्य भूमिः प्रमाऽन्तरिक्षमुतोदरम्।
दिवं यश्चक्रे मूर्धानं तस्मै ज्येष्ठाय ब्रह्मणे नमः ॥३२॥
यस्य सूर्यश्चक्षुश्चंद्रमाश्च पुनर्णवः।
अग्निं यश्चक्र आस्यं तस्मै ज्येष्ठाय ब्रह्मणे नमः ॥३३॥
यस्य वातः प्राणापानौ चक्षुङ्गिरसोऽभवन।
दिशो यश्चक्रे प्रज्ञानीस्तस्मै ज्येष्ठाय ब्रह्मणे नमः ॥३४॥
स्कम्भो दाधार द्यावापृथिवी उमे इमे स्कम्भो दाधारोर्वन्तरिक्षम्।
स्कम्भो दाधार प्रदिशः षड्र्वीः स्कम्भ इदं विश्वं भुवनमाविवेश ॥३५॥
यः श्रमात् तपसो जातो लोकान्त्सर्वानत्यसमानशे।
सोमं यश्चक्रे केवलं तस्मै ज्येष्ठाय ब्रह्मणे नमः ॥३६।

अथर्ववेद कांड १० सुक्त ७ मंत्र ३२ ते ३६

ये भूतं च भव्यं च सर्वं यश्चाधितिष्ठति।
स्व, र्यस्य च केवलं तस्मै ज्येष्ठाय ब्रह्मणे नमः॥१॥

अथर्ववेद कांड १० सुक्त ८ मंत्र १

संपूर्ण भुमंडल ज्याचे एका पाऊलाच्या प्रमाणाएवढे आहे, अंतरीक्ष ज्याचे पोट आहे, ज्याने द्युलोकास आपले शिर बनविले आहे त्या सर्वश्रेष्ठ व ज्येष्ठ ब्रह्मास माझा नमस्कार असो.( ३२ ) सूर्य आणि चंद्र हे दोन ज्याचे डोळे आहेत, ज्याने अग्नीला आपले मुख बनविले, त्या ज्येष्ठ ब्रह्मास माझा नमस्कार असो.( ३३ ) ज्या ब्रह्माचे प्राण आणि अपान हे वायु आहेत. ज्याच्या डोळ्यात अंगिरस वसलेला आहे. प्रज्ञामय दिशा ज्याचे नाक आहे. त्या ज्येष्ठ ब्रह्मास माझा नमस्कार असो.( ३४ ) जे तप रुपी श्रमाने प्रगट होऊन सर्व लोकात व्याप्त झालेले आहे. ज्याने सोमरसाला केवळ औषधीरुप एक सर्वशक्ति बनविलेली आहे त्या ज्येष्ठ ब्रह्माला माझा नमस्कार असो.( ३५ ) या सर्वांच्या आधाररुप ब्रह्माने पृथ्वी आणि द्युलोकाला धारण केलेले आहे, त्याच ब्रह्माने अंतरिक्ष पण धारण केलेले आहे. या ब्रह्मानेच सहा मोठ्या दिशा पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण, पृथ्वी आणि आकाश धारण केलेल्या आहेत, ते ब्रह्मच या साऱ्या विश्वात प्रविष्ट झाले आहे.( ३६ )

जे भूतकाल, भविष्यकाळ व वर्तमानकाळ या तीनही काळांचा अधिष्ठाता बनलेला आहे, ज्याचे स्वरूप केवळ प्रकाशमय आहे त्या सर्वश्रेष्ठ ब्रह्मास माझा नमस्कार असो.( १ )

# मंत्र २८ वा.

## सहु देव - देवताने कुळ - ऋषीवरोने नमस्कारनो मंत्र.

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरुं छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

आद्य नारायणने नमस्कार श्री ब्रह्मा विष्णु महेश्वरने नमस्कार, आद्यशक्ति लक्ष्मीने नमस्कार श्री निष्कलंकी नारायणने नमस्कार, श्री शक्तिमाताने नमस्कार. प्रथम पुरुषने नमस्कार, सप्तऋषीयोने नमस्कार, हरिवंश कुळ कायमना परिवारने नमस्कार, धरती आकाशने नमस्कार, पवन पाणीने नमस्कार, चन्द्र सूर्यने नमस्कार, रविमंडळने नमस्कार, ध्रुवमंडळने नमस्कार, नवलाख ताराने नमस्कार, बारकुळ मेघने नमस्कार, सातसमुद्रने नमस्कार, नवसोनव्वाणु नदीयोने नमस्कार, अगीयार रुद्रने नमस्कार, बार आदित्यने नमस्कार आठ वसुने नमस्कार, बे अश्विनीकुमारोने नमस्कार, ओगणपचास मरुत गणने नमस्कार, अेकवीस ब्रह्मांडने नमस्कार, स्वर्ग मृत्यु पाताळने नमस्कार, सातवार सत्तावीस नक्षत्रने नमस्कार, पंधरतीथी बार करणने नमस्कार, नवग्रहने नमस्कार, सातद्विप नवखंड पृथ्वीने नमस्कार, चोवीस

मुलकने नमस्कार. अष्टकुळ पवर्तने नमस्कार, नवकुळ नागने नमस्कार, चारवेदने नमस्कार, चारखाणी चारवाणीने नमस्कार, अग्नितेज अन्न देवने नमस्कार, अढारभार वनस्पतीने नमस्कार, आद्यमध्य अंतना देवलोकने नमस्कार, बार राशीने नमस्कार, कुळगोत्रने नमस्कार, पितृदेवने नमस्कार, उत्तर दक्षिण पूर्व पश्चिमने नमस्कार, दश दिक्पालने नमस्कार, दशे दिशाओने नमस्कार, नवनाथ चौर्याशी सिध्दने नमस्कार, चोसटलाख देवीयोने नमस्कार, जगतना बधा संत महात्माओने नमस्कार, अडसष्ठ तीर्थने नमस्कार, नव्वाणुकरोडी यक्षने नमस्कार, छप्पन करोडी मेघाने नमस्कार, बत्रीस करोडी किन्नरने नमस्कार, पाच करोडीशुं प्रल्हादने नमस्कार, सात करोडीशुं हरिश्चन्द्रने नमस्कार, नवकरोडीशुं युधिष्ठिर पाचे पांडवने नमस्कार, बार करोडीशु सद्‌गुरु ब्रह्माने नमस्कार, अनंत करोडीशु कमळाकुवरने नमस्कार, तेत्रीस करोडी देवने नमस्कार, कुळ ऋषीवर गतगंगाने नमस्कार, दशे अवतारोने नमस्कार, मुखीमुशाफरने नमस्कार, चौद भुवनना देव लोकने नमस्कार, स्वामी अमारा अपराध क्षमा करो, सतपंथना मार्ग माहे राखो लक्ष चौर्यायशीना फेरा टाळो, तेत्रीस करोडी अनंतना मेळा आपो जांबुद्विपना धणी, सद्‌गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

या अखिल ब्रह्मांडातील देवगण, चराचरातील सुरशक्ति, दशदिशात व्यापलेले देवगण, सृष्टीतलावरील देवगणासहित इन्द्र, चन्द्र, वायु, वरुण, सूर्य, अग्नी, विश्वकर्मा, अर्यमा, यमधर्म, कुबेर, अश्विनीकुमार, धन्वन्तरी, बृहस्पति, विधाता वगैरे सर्व सृष्टीचक्रचालक देव देवतांना आवाहन करुन, भक्तीभावपूर्वक त्यांना नमन करून आसन अर्ध्य पाद्याने पूजा केली जाते नंतर उद धूप दिपाने ओवाळून आराधना करतात की, हे देव देवतागणहो आमची ही पूजा आपण स्विकारावी व प्रार्थना करून त्या त्या देवतांना त्यांच्या त्यांच्या आवडीचा नैवेद्य अर्पण करतात त्यांना विनंती करतात की हे भगवन् तुम्ही आम्हाला सुखी करा. आम्हाला बळ द्या, संसारातील त्रिविध ताप सहन करण्याची शक्ति द्या. सत्धर्ममार्गाचा उपदेश आम्हाला करा. आमच्या हातून धर्ममार्गात कोणत्याही प्रकारचा प्रमाद घडू देवू नका. आपल्या कृपाप्रसादाने व कृपाशिर्वादाने आम्हाला सौख्य शांति आनंद यांची प्राप्ति होवो, सांसारिक भोगामधून मुक्त करून आम्हाला मुक्तिमार्गाचे दर्शन घडवा.



अग्नाविष्णू महि तद् वां महित्वं पाथो घृतस्य गुह्यस्य नाम।
दमे दमे सप्त रत्ना दधानौ प्रति वां जिह्वा घृतमाच्चरण्यात् ॥१॥
अग्नाविष्णू महि धाम प्रियं वां वीथो घृतस्य गुह्या जुषाणौ॥
दमे दमे सुष्टुत्या वावृधानौ प्रति वा जिव्हा घृतमुच्चरण्यात् ॥२॥

अथर्ववेद कांड ७ सूक्त २९ मंत्र १-२

अपूपवान क्षीरवांश्चरुरेह सीदतु। लोककृतः पथिकृतो यजामहे,
ये देवानां हुतभागा इह स्थ ॥१६॥

अथर्ववेद कांड १८ सुक्त ४ मंत्र १६

अग्नि आणि विष्णु हे दोन्ही देव एकाच स्थानात राहतात. त्या दोघांचा खूप मोठा महिमा आहे. ते दोघे गुप्त रीतीने गुहेत बसून तूपाचे सेवन करतात. प्रत्येक घरात सात रत्न ठेवतात आणि आपल्या जीभेने गुह्यागारातील तुपाचा सुध्दा स्वाद घेतात. (थोडक्यात म्हणजे त्या देवतांना तूपापासून तयार केलेले सर्व पदार्थ फार आवडतात.) (१)

या दोन्ही देवांचे एकच अत्यंत प्रीय स्थान आहे, दोन्ही तूपाच्या गुह्यरसाचा स्वाद घेतात. प्रत्येकाच्या स्तुतिच्या योगाने ते पुढे पुढे जातात आणि अत्यंत गोपनिय ठिकाणी असलेला आस्वाद ते आपल्या जीभेने घेतात. (२)

जे या जगतातील उध्दारक मार्गदर्शक लोक असतील त्यांना यज्ञात नानाप्रकाराने तयार केलेल्या चरुने नैवेद्यप्रसादाने त्यांचे स्वागत करावे. (१६)

# मंत्र २९ वा

## विष्णुनी थाळप्रसाद (लापसी - कंसार) नो नैवेद्यनो मंत्र
## (थाळ उपर चरणामृत मूकी, मंत्र बोली थाळ समर्पणनो संकल्प करवो.)

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरु छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्‌गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्वामी तमे आद्यरूप पछी अलख चतुरगुणमा तमे अेक. ॐ कार निरंजन निराकार, उपज्या पींडते साकार निरंजने तो कृपा करी, सत्य सिंचीने उपज्या हरी, हरीये त्या धर्या अवतार, तमे निरंजन निराकार स्वामी चतुरयुगमा तमारा दश अवतार. स्वामी श्री मच्छ, स्वामी श्री कूर्म, स्वामी श्री वराह, स्वामी श्री नृसिंह अवतार, सोळ करोड कुळ परिवार, स्वामी श्री वामन, स्वामी श्री परशुराम, स्वामी श्री राम अवतार, छत्रीस करोडी कुळ परिवार, स्वामी श्रीकृष्ण, स्वामी श्री बौध्द अवतार, छपन्न करोड कुळ परिवार, स्वामी श्री निष्कलंकी नारायण दशमो अवतार, हरिअंश कुळ कायमना परिवार श्री सद्‌गुरु स्वामीजी सद्‌गुरु इमामशाह निरंजन निष्कलंकी नारायण तमारा निमित्ते, तमारी भोजनस्थळे

मुनिवर ऋषिवर सेवक नरनारी बालगोपालनी थाळबत्रीसी स्वीकार करो, तमारी समक्ष जे धर्यु होय ते स्वीकारो. पाच तनपवित्र आत्मा पवित्र, आत्माओ पवित्र, नवतनशाख देव आशिष तमारी; प्रार्थना अमारी तमे स्वीकारो, तमारे भावेस्वभावे अमारे निमित्ते तमारे भोजनस्थळे तमे स्विकारो, अन्नपाणीना आहार, पान फूल फळना भोक्ता तमे, दाता तमे भोक्ता तमे, कर्मधर्म तमारा, भावभक्ति अमारी, स्वामीजी तमे स्विकारो, आज कलियुगमा दर्शन आपो अथर्ववेदना आधारे हो स्वामीजी, निरंजन निष्कलंकी नारायण, मुखी मुसाफरनी आशिष पंचभाग स्विकार करो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम:।।

हे विष्णु नारायणा! तुझे आद्यस्वरुप स्वयं ज्योतीरुप अलक्ष्य अगोचर आहे. सत्व, रज, तम व संत्वाक्ष यापैकी तू सत्व गुणाधिष्ठित देवतास्वरूप आहेस निलवर्ण धुंधु:काराच्या तेजोवलयापासून तुटलेला एक स्वयंप्रकाशित तारा स्वरूप तू आहेस. या जगतातील जेवढे काही सत्वभाव आहे ते संपूर्ण तूच आहे. तू साकाररुप धारण करून या जगताचे धारण पोषण व संरक्षण करीत असतो. संरक्षण करण्यासाठी तू वेगवेगळे अवतार धारण करून जगताला धर्ममार्ग शिकवितो. त्या धर्ममार्गाचे अवलंबन करून जे जीवात्मे वागतात ते मोक्षगतीस प्राप्त होतात. सत्ययुगात तू वेगवेगळे चार अवतार धारण केले. मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह हे अवतार धारण करून जगताला आचार-विचार-धर्म शिकविला त्या सत्यधर्माप्रमाणे जे जीवात्मे वागले ते सोळा कोटी जीवात्मे कुळपरिवारासहित स्वर्गसुखाचे भोक्ते होऊन अमर झाले. दुसऱ्या त्रेतायुगात भगवंताचे तीन अवतार झाले. वामन, परशुराम व श्रीराम यांनी जगताला आचार विचार धर्म शिकविला त्या सत्यधर्माप्रमाणे जे वागले ते छत्तीस कोटी जिवात्मे कुळ परिवारासहित स्वर्गीय सुख उपभोगून अमर झाले. तिसऱ्या द्वापारयुगात भगवंताचे दोन अवतार झाले. श्रीकृष्ण व श्रीबुध्द यांनी जगताला जो आचार विचार धर्म शिकविला त्या सत्यधर्माप्रमाणे जे वागले ते छपन्न कोटी जिवात्मे कुळ परिवारासहित स्वर्गीय सुख उपभोगून अमर झाले. त्याच युगधर्मानुसार श्री निष्कलंकी नारायण या कलियुगात ज्यांचे प्रागट्य आहे ते जो आचार विचार धर्म शिकवीत आहे व पुढे शिकवतील. त्या सत्य धर्माप्रमाणे जे वागले व वागतील असे हरी अंशी जिवात्मे स्वर्गीय सुख उपभोगून अमर होतील.

सद्गुरु इमामशाह महाराज जे या युगाचे युगगुरु आहेत, मार्गदर्शक सद्गुरु आहेत, युगधर्मानुसार सद्गुरुब्रह्माचे अवतार स्वरूप आहेत त्यांची विनंती निरंजन निष्कलंकी नारायण भगवंताला आहे की, हे निष्कलंकी भगवान तू आम्ही सेवकांनी केलेली विनंती स्विकारून आम्ही पूर्ण भक्तिभावाने शिजवून तयार केलेल्या ह्या अन्नाचा प्रसाद आपण स्विकारावा, शुध्द पवित्र होऊन, पवित्र अंत:करणाने हा प्रसाद (थाळ बत्रीसी म्हणजे बत्तीस प्रकारचे वेगवेगळे पदार्थ) तुझ्या नैवेद्याकरिता आणलेले आहेत त्यांचा आपण स्विकार करावा. आम्ही तुझ्या साक्षीने निरहंकार बुद्धिने जी फळे व नैवेद्य अर्पण करीत आहोत त्याचा आपण स्विकार

करावा. हे विष्णु भगवंता! ज्याप्रमाणे तुझे पंचायतन पवित्र आहे, आमचा आत्मासुध्दा पवित्रच आहे. पवित्र अशा अंत:करणाने व भगवंताच्या साक्षीने व कृपाशिर्वादाने मनोभावे केलेली विनंती आपण स्विकारावी. तुझा आहार अन्नपाणी, पान, फूल, फळ यांचा असून तो तू स्विकार तू दाता आहेस (देणारा आहेस) व भोक्ता (उपभोग घेणारा) सुध्दा तूच आहेस. कर्म करणारा, धर्म जाणणारा सुध्दा तूच आहेस, आमच्या अंत:करणात वसलेली भाव भक्ति जाणणारा सुध्दा तूच आहे. या कलियुगात सद्भक्तांना अथर्ववेदाच्या आधाराने दर्शन द्यावे. हे निरंजन निष्कलंकी नारायणा! या सद्भक्तांना दर्शन द्या व त्यांनी अर्पण केलेला नैवेद्य स्विकारा.



यो भूतं च भव्यंच सर्वं यश्चाधितिष्ठति।
स्व १ र्यस्य च केवलं तस्मै ज्येष्ठाय ब्रह्मणे नमः ॥अथर्व १०/८/१
हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत्।
स दाधार पृथिवीमुत द्यां कस्मै देवाय हविषा विधेम ॥४/२/७
अपूपवान क्षीरवांश्चरुरेह सीदतु लोककृतः पथिकृतो।
यजामहे य देवानां हुतभागा इह स्थ ॥अथर्व. १८/४/१६

जो परमेश्वर भूतकाल, भविष्यकाल आणि जो संपूर्ण जगताचा अधिकारी आहे. अधिष्ठाता आहे, सुख ज्याचे केवल स्वरूप आहे त्या सर्वश्रेष्ठ ब्रह्मास मी नमस्कार करतो. (१)

अत्यंत तेजस्वी लोकांचा आधार सर्वप्रथम विद्यमान होता. तोच महातेजस्वी स्वरूप प्रगट होऊन पृथ्वी आदि पंचमहाभूतांचा एक पति, ईश्वर झाला. त्याने पृथ्वी आणि सूर्यास धारण केले. त्या प्रजापति परमेश्वराची दिव्य गुणाकरिता आम्ही सेवा करतो. (७)

अपूप म्हणजे शुध्द रीतीने पकविलेले भोजन उदा. मालपुआ पुरी अथवा दुधाचा चरु बासुंदी इथे वेदीवर आणून तिचा तुम्ही स्विकार करावा. समाजाला सुयोग्य वळण लावण्याकरितां व योग्य मार्गदर्शन करण्याकरितां आम्ही तुमचे पूजन करतो. आपण महान् विद्वान श्रेष्ठ ज्ञानी इथे आपला नैवेद्याचा भाग स्विकारा. (१६)

# मंत्र ३० वा

## ब्रह्माजीने थाळ प्रसाद नैवेद्य जमाडवानो मंत्र.
## (प्रसाद शीरानो मुकवो.)
### (थाळ उपर चरणामृत मूकी मंत्र बोली थाळ समर्पणनो संकल्प करवो.)

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरू छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरू पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

निरंजन नाम ते निराकार, ईंड थकी किधो विस्तार, करपर किधु द्रष्टे काम, आपोआप वध्याप्रमाण, नाभीये वध्यु कमळसार, उपज्या ब्रह्मा ॐ कार, अनंत ब्रह्मा थया मलघ्न, हरी हाथमा थया कुलंग (हंस) ब्रह्मा तनथी बुंदज खर्या, अनंत करोडी जीव अवतर्या, रची खाणने वर्त्याविद, सर्ज्या सतपंथने अमरभेद, ब्रह्माविष्णुअे धर्या अवतार, अंश अेकने अन्य परिवार, अंश जेवा चन्द्रमासूर्य, धरी अवतारने सर्जानूर, वेद अंशे जे अमरभेद, प्रगट्या ब्रह्मा चारे वेद, चौ मुखी ब्रह्मा अमर तेज, पाचमे मुखे अमरभेद. वशिष्ट, वेदव्यास, हंस, तेज प्रकाश श्रीमस्य, कूर्म, वराह, नृसिंह वामन, परशुराम, राम, कृष्ण, बौध्द निष्कलंकी नारायण शक्तिमाता, सद्गुरु स्वामी निरंजन निष्कलंकी नारायण. तमारा निमित्ते तमारी भोजनस्थळे, मुनिवर ऋषिवर सेवक नरनारी बाळ गोपाळनी थाळ बत्रीसी स्विकारो, तमारी समक्ष जे धर्यु धराव्यु होय ते स्विकारो, तमारा अरवार परवार साथे स्विकारो, सेवकना भावे स्वभावे स्विकारो, तमारी आसना वासनाये स्विकार करो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः ॥

निरंजन, निरव्यवयव, निराकार परमेश्वराच्या सत्य संकल्पाने ईंडा मधून ब्रह्मांडाच विस्तार झाला. सगुण साकार ब्रह्माने केवळ दृष्टीमात्राने हा विस्तार केलेला आहे. सगुणसाकार ब्रह्माच्या अनंत कलेपासून नाभीस्थानातून एक कमळ निर्माण झाले व त्या कमळात स्वयंभूब्रह्माने आपले रुप प्रगट केले. त्या सगुणसाकार, निर्गुणनिराकार ब्रह्माने ह्या संपूर्ण जगताची उत्पत्ति केली. ब्रह्म - अविद्य, सत् - असत् तत्वातील हंस निर क्षिर न्यायातील तत्वानुसार या जगतातील सत् तत्वाचा शोध घेऊन सद्भक्तांना त्याचा उपदेश करतो त्या ब्रह्मतनापासून एक बुंद निर्माण झाला व त्या पासून अनंत कोटी जीव निर्माण झाले व नादब्रह्मापासून वाणी प्रगट हाऊन परा पश्यंति मध्यमा व वैखरी ह्या वाणी प्रगट झाल्या. हा उपदेश गुरु शिष्य परंपरेने

जगतात चालत आला व ते ज्ञान पृथ्वीच्या अंतापर्यंत चालू राहिल. ब्रह्माने सद्गुरु ब्रह्मरुपाने अवतरीत होऊन व विष्णुने मुख्य दशावतार रुपाने प्रगट होऊन जगतकार्याकरितां हे अवतार धारण केले. ज्या वंशात ब्रह्माला ज्ञानदाता जाणून त्यांची उपासना केली जाते व ज्या वंशात विष्णूला परिपालक व संरक्षण समजून उपासना केली जाते, जगतात केवळ तेच वंश धन्य होत व त्या वंशातच हरीअंश असतो. पुरातन काळापासून चंद्रवंश व सूर्यवंश हे परंपरेने चालत आलेले आहेत. हे दोनही तेजाचे द्योतक आहेत. या वंशात जन्मास येऊन ज्यांनी दान, दया, तपश्चर्या, शुचिर्भूतता यांचे पालन केले, सत्य, प्रेम, अहिंसा, शांतिचे अवलंबन केले असे महान महान राजे, महाराजे उध्दरले जाऊन या संपूर्ण जगतास ललामभूत झाले. त्यांच्या किर्तीच्या बळावर व पुण्याईवर जगतातील जिवात्म्यांचा आजही उध्दार होतो व पुढे होईलही. त्या महापुरुषांना नमस्कार असो. वेदात सांगितलेला अध्यात्मशास्त्राचा जो अमरभेद आहे ज्या योगाने अमृतत्व प्राप्त होते. ब्रह्माच्या चार मुखातून स्त्रवणारे चार वेदाद्वारे मनुष्य जीवन सुखमय समृध्दमय करण्याकरितां वेगवेगळ्या देवदेवतांची उपासना केलेली आहे पण पाचवावेद मात्र अमरभेद, शिकविणारा आहे. अमृतत्वाची प्राप्ती करण्यास त्याच वेदाचे अनुसरण करावे. अमरतेज, वशिष्ट, वेदव्यास, हंसस्वरूप इमामशाह हे संपूर्ण वेदांचे द्रष्टे महापुरुष व अमरभेदाचे मार्गदर्शन करणारे सिध्द पुरुष आहेत. श्री मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बुध्द, निष्कलंकी नारायण हे सर्व त्याच सत् धर्माचे पाईक आहे. त्यांनी वेळोवेळी केलेले धर्ममार्गाचे आचरणच मानव मात्रास ललामभूत झालेले आहेत. हे ब्रह्मस्वरूप भगवंता! आम्ही तुझेच उपासक भक्त आहोत. आम्ही प्रेमभराने आपणास नैवेद्य अर्पण करीत आहोत. घृत, शर्करा, दुग्ध युक्त, शीरा हे पक्वान्न तुला फार आवडते. भक्तिभाव प्रेमाने अर्पण केलेला हा नैवेद्य तू स्विकार. हे ब्रह्मस्वरूप भगवंता आपल्या संपूर्ण परिवारासहित तू या नैवेद्याचा स्विकार कर. आम्हाला बल दे सुख शांति दे, समृध्द कर व ब्रह्मज्ञानाचा उपदेश कर.



भवाशर्वौ मृडतं माभियातं भूतपती पशुपति नमो वाम्।
प्रतिहितामायतां मा वि स्त्राष्टं
मा नो हिंसिष्टं द्विपदो मा चतुष्पदः ॥१॥ अथर्व. ११/२/१
नमस्ते घोषिणीभ्यो नमस्ते केशिनीभ्यः॥
नमो नमस्कृताभ्यो नमः संभुञ्जतीभ्यः॥
नमस्ते देव सेनाभ्यः स्वस्ति नो अभयं च नः ॥३१ अथर्व ११/२/३१
अपूपवान क्षीरवांश्चरुरेह सदितु।
लोककृतः पथिकृतो यजामहे ये।
देवानां हुतुभागा इहस्थ ॥१६ अथर्व १८/३/१६

हे जगत्स्थिती उत्पत्तिकर्ता, पालनकर्ता व संहारकर्ता भगवान् तुम्ही सर्व देव आम्हाला सुखी करा. शत्रुकडून आमच्यावर कधीच आक्रमण होऊ देऊ नका. हे भगवन तुम्ही भूतपति आणि पशुपति आहांत तुम्ही संपूर्ण त्रैलोक्याचे उत्पत्तिकर्ते आणि संहारकर्ते आहात. तुम्ही आमचे पालनपोषण व संरक्षण करा. तुम्हा सर्व देवांना नमस्कार असो. धनुष्य वर ठेवलेला आणि खेचलेला बाण आमच्यावर सोडू नका. आम्हां मानव मात्रावर व पशुप्राणिमात्रावर दया करा. आमची हिंसा करूं नका. हे महेश्वर देव! तुझी अत्यंत भयंकर आवाज करणारी सेना, केस वाढवून महाभयंकर दिसणारी सेना पाहून मी नतमस्तक होतो. जगतातील सर्व सेनेकडून सत्कारीत झालेली आणि उत्तम प्रकारच्या अन्नभोग करणारी तुझ्या सेनेला माझा नमस्कार असो. आमचे कल्याण होवो आणि आम्ही निर्भयपणे या जगतात राहावे अशा प्रकारचे संरक्षण तुम्ही आम्हास द्या. जे या जगतात उध्दारक आणि मार्गदर्शक देव आहेत त्या सर्वांना यज्ञात तयार केलेले वेगवेगळ्या अन्नाचे चरु आम्ही अर्पण करतो ते आपण स्विकारावे. गहू, साखर, तूप, दुध, दही यांनी युक्त निरनिराळे पदार्थ, मोदक, लाडू, खीरपुरी, सर्व देवांना अत्यंत प्रीय आहे. यज्ञात आहूतीद्वारा मी ते आपणास अर्पण करतो ते आपण स्विकारावे.

# मंत्र ३१ वा.

## महेश्वरनी थाळ प्रसाद नैवेद्यनो मंत्र. (प्रसाद मोदक लाडूनो मूकवो) (थाळपर चरणामृत मूकी, मंत्र बोली, थाळ समर्पणनो संकल्प करवो.)

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरुं छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे:-

ॐ कार आद्य निरंजने धर्या हेत, ललाटेथी लीधा श्वेद लइने ध्यान धरी रहया, लखचांदरणा धुंधुकार वही गया. करमध्ये ध्यान धरी रहया, चौर्याशी चौकडी छत्रीस जुग वही गया, तदा श्वेदथी नीर, नीरथी क्षीर, क्षीरथी फीण, फीणथी ईंड. ईंडथी किधा प्रकाश. चतुर गुणने धरती आकाश. तेजथी सर्जा सर्व जात. आसमान सात अने ऋषि सात. तमे निरंजन अमरदेव. मस्तकथी उपन्या महादेव, हृदये विष्णु, नाभीये ब्रह्मा, जंघस्थळे इच्छा करी, अंगथकी शक्ति अवतरी, उपजी शक्ति ते मायामा परवरी. त्यारे सृष्टि उत्पन्न करी. मायामाहे धर्या संतोष. त्यारे निपजा चौद लोक. आदि सरज्या त्रण लोक.

नही वाचा ने नही बोल. ब्रह्माजीये आप्यु प्रमाण. जही ब्रह्माये किधु जाण. त्रण टोळ माहेथी बे विफर्या. अेके राख्यो धर्म. धर्मीने आप्यो सतपंथ. छुट्या लक्षचौर्यायशीना फेरा फंद. ऋग्वेदनी देखाडी वाट. सोप्या यज्ञ कलशने पाट. स्वामीजीये जीव उध्दार्या. नव्वाणु करोडी यक्ष, छप्पन करोडी मेघा, बत्रीस करोडी किन्नर, तेत्रीस करोडी देव. ते घटपाट सेवता, नृसिंह, अमरतेज, शाम, राम, वशिष्ट, ब्रह्मेश्वर बुध्देश्वर, हरिवंशथी विस्तार, वंश एकने अन्य परिवार, ब्रह्मपरिवार विष्णुपरिवार, शिवपरिवार, शक्तिपरिवार; तमारो परिवार. प्रल्हाद, हरिश्चन्द्र, युधिष्ठिर, कमळाकुंवर. श्री निष्कलंकी नारायण दशे अवतार श्री सद्गुरु इमामशाह निरंजन निष्कलंकी नारायण तमारा निमित्ते तमारा भोजनस्थाने मुनिवर ऋषिवर सेवक नरनारी बाळगोपाळनी थाळ बत्रीसी स्विकारो. कुळ परिवार सप्तऋषीसहीत स्विकारो, तमारा वारानी संगते, तमारा समक्ष जे धर्यु धराव्यु होय ते स्विकारो, शिवशक्ति परिवार, विष्णुपरिवार, ब्रह्म परिवार, चतुरकुळ सहित निरंजन तमे स्विकारो, आशिष आपी स्विकारो, तमे दाता, तमे भोक्ता, कर्म तमारु, धर्म तमारा अमे मानीये गुण तमारा, तमे जमो, तमे जमाडो, सेवक अपराधी छे. स्वामीजी तमे सेवकना अपराध क्षमा करो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

ॐ कार स्वरूप आद्य भगवंताने मनात हेतु धरून, लल्लाट प्रदेशातून जो अमृतबिंदू स्खलन झाला त्यावर सृष्टीनिर्मात्या भगवंताने अनंत काळपर्यंत ध्यान केले. चन्द्रकिरणाप्रमाणे शितल पण सूर्याप्रमाणे अत्यंत दैदिप्यमान तेजस्वी भगवंताने आपल्याच हातात ओंजळीत ध्यान केले व त्यास सृष्टीनिर्मीतीचे ज्ञान स्फूरु लागले. अनंत काळपर्यंत भगवंताने हे ध्यान केले तेव्हा अमृतबिंदूपासून जल निर्माण झाले, जलाचे फेस युक्त क्षीरात रुपांतर झाले, फेसामधून अंडाकृति गोळा निर्माण झाला. त्या ईंडात चतुरगुणांनी युक्त असे देव प्रगटले व त्यांनी आकाश, तेज, वायु, जल व पृथ्वी हे पंचमहाभूते निर्माण केली. या पृथ्वीतलावर सात आकाश निर्माण केले, त्याचे मुख्य सप्तऋषि निर्माण झाले. निरंजन नारायणाच्या मस्तकापासून महादेवाची उत्पत्ति झाली, हृदयापासून विष्णुची उत्पत्ति झाली, नाभीकमलापासून ब्रह्मदेवाची निर्मिती झाली तर जांघेपासून शक्तिची निर्मिती झाली. ती शक्ति मायेत परिवर्तीत झाली. त्या मायेने संपूर्ण जगतास निर्माण केले. मायेने संतति निर्माण करण्याच्या हेतूने तिनही देवाना वरिले व मनात संतोष आनंद धारण करून त्रिभुवनातील चौद भुवनात मानव, दानव व देव निर्माण केले. देवांची सृष्टी सप्त उर्ध्वलोकांची व दानवांची सृष्टी सप्त पाताळ लोकांची आणि मानवी सृष्टी मृत्यूलोकांची निर्माण झाली. देव, दानव व मानव यांनी ब्रह्मदेवाची तपश्चर्या केली. ब्रह्मदेवाने प्रसन्न होऊन त्या तिघांना एकाच शब्दाने वरदान दिले 'द' हा तो शब्द होय. त्याचा अर्थ हा कि मानवाने निरिच्छ निरहंकार बुध्दीने 'दान' धर्म

करावा. दानवाने जीव प्राणिमात्रावर 'दया' करावी व देवांनी इंद्रिय 'दमन' करावे. या सत्धर्माप्रमाणे जे वागतील ते जीवात्मे अमरगतीस प्राप्त होतील पण जे तसे वागणार नाही ते लक्षचौर्यायशीचे फेरे खातील. व जे जीवात्मे देवधर्म, पापपुण्य, वगैरे काहीच जाणत नाही. सदैव पापकर्म, दुर्व्यसन, कुसंगतीत राहून दुराचारी होतील, त्यांना कोणतीही गति प्राप्त होणार नाही, ते कल्पांत काळापर्यंत नरकागारात खिचपत पडतील. अशा प्रकारे तीन गतीचे फेरे जीवात्मा उपभोगेल. यापैकी जो जीवात्मा सत्धर्माचे आचरण करील, तो सतपंथाप्रमाणे वागेल त्याचे लक्षचौर्याशीचे फेरे मिटतील. युगधर्मानुसार ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद यांची वाट जे महापुरुष युगपुरुष दाखवतील व आत्मोन्नतिचा मार्ग शिकवितील तेच सर्वश्रेष्ठ युगगुरु, ब्रह्मगुरु वा सद्गुरु ब्रह्मा होत व त्यांनी कलश घटपाटाची पूजा कर्मकांड रुपाने दिग्दर्शित केली त्यायोगे अनंत कोटी जीवात्म्यांचा उध्दार झाला. प्रथम कल्पात नव्वाणु करोडी यक्ष, द्वितीय कल्पात छप्पन कोटी मेघा, तृतीय कल्पात बत्तीस कोटी किन्नर व या कल्पात तेहेतीस कोटी देवतागण सद्गतीस प्राप्त झाले. त्यांनी घटपाटाची सेवा केली व ते अमर झाले. श्रीनृसिंह, अमरतेज, श्रीकृष्ण, श्रीराम, वशिष्ट, ब्रह्मस्वरूपव्यास, श्रीबुध्द यांच्यासारखे दिगंत किर्तीचे दिव्योत्तर पुरुष या अवनीतलावर अवतरले हरीवंशात त्यांचा विस्तार झाला. भगवंताचा अंश एक आणि बाकी त्याचे सारे परिवार, त्यात ब्रह्म परिवार, विष्णुपरिवार, शिवपरिवार, शक्तिपरिवार तसेच प्रल्हाद, हरिश्चन्द्र, युधिष्ठिर, सद्गुरुब्रह्मा, कमळाकुवर, श्री निष्कलंकी नारायणाचे अनंत अवतार या सर्वांचा समावेश हरीवंशात होतो. सद्गुरु इमामशाह महाराज निरंजन निष्कलंकी नारायणाला व त्यांच्या संपूर्ण हरिवंशाला प्रणाम करून विनंती करतात की तुम्ही सर्व देवगण आपापल्या परिवारासहीत संपूर्ण ऋषि-मुनिकुळ, सप्तर्षिगण, शिवशक्ति परिवार, विष्णु परिवार ब्रह्म परिवारासहित आमच्या भोजनस्थानात येऊन आम्ही प्रेमभक्तीभावाने अर्पण केलेली नैवेद्याची थाळ स्विकारा. पंचपक्वान्न, लाडू, मोदक वगैरे तुमचे आवडते खाद्य नैवेद्य म्हणून आम्ही तुम्हाला अर्पण करतो त्याचा तुम्ही स्विकार करावा व आम्हाला आपला कृपाशिर्वाद द्यावा. हे भगवंता! तुम्ही दाते आहात, आम्ही कर्मफलाचे भोक्ते आहोत. हे भगवत्स्वरूप! आम्ही केवळ कर्म करण्याचे अधिकारी आहे. कर्मफल देणारे केवळ तुम्हीच आहांत. आम्ही केवळ तुमच्या गुणांची उपासना करणारे आहोत. हे भगवंता, तूच सर्वांचे पोषण करणारा आहे. आम्ही अपराधी जीवात्मे तुझीच भक्ति करतो तू आम्हाला क्षमा कर व पदरात घे.



सिनीवाली पृथुष्टुके या देवानामसि स्वसा।
जुषस्व हव्यमाहुतं प्रजां देवि दिदिड्ढि नः॥१॥
या सुबाहुः स्वङ्गुरिः सुषूमा बहुसूवरि।
तस्यै विश्पत्न्यै हविः सिनीवाल्यै जुहोतन॥२॥
या विश्पत्नीन्द्रमसि प्रतीची सहस्रस्तुकाभियन्ति देवी।
विष्णो पत्नी तुभ्यं राता हर्वींषि पतिं देवी राधसे चोदयस्व॥३॥

अथर्व ७/४६/ १ ते ३

शिवानः शंतमा भव सुमृडीका सरस्वति।
मा ते युयोम संदृशः अथर्व ७/६८/३
अपूपवान क्षीरवांश्चरुरेहे सीदतु।
लोककृतः पथिकृतो यजामहे ये।
देवानां हुतभागा इह स्थ॥ अथर्व १८/४/१६

१. हे अन्नयुक्त आणि बऱ्याच लोकांनी जी प्रशंसा केलेली आहे अशी हे देवी! तू संपूर्ण देवतांची माता आणि भगिनी आहेस. हे देवी तू हवनाच्या आहूतिमधून आमच्या नैवेद्याचा स्विकार कर, आणि उत्तम संतान दे.

२. जीचे बाहु अति उत्तम आहेत, जिचे सर्व अंग अति उत्तम आहे जीचे सर्व बोटे अति उत्तम सुकुमार आहेतअशी हे देवी! तू उत्तम प्रकारचे संतान उत्पन्न करणारी सर्व समर्थ आहे. हे प्रजापालक अन्नदेव देवतांच्याकरिता अन्नाची म्हणजे नैवेद्याची हवी हवन प्रदान कर.

३. हे प्रजापालक देवी! तू भगवंताच्या सदैव समोर राहतेस. भगवंताच्या समवेत राहतेस हजारो कवींच्या द्वारा प्रशंसापात्र हे देवी! तू उत्तरोत्तर आमची उन्नति कर मी अनन्यभावाने तुला शरण आलेलो आहे. हे विष्णुपत्नि लक्ष्मीमाते! तुझ्याकरिता हे हविश्यान्न अर्पण करतो. तू स्विकार कर. माते! हा नैवेद्य स्विकारून तू आम्हाला सुखी कर. आमच्या सिध्दिकरिता हे माते! तू तुझ्या पतिला प्रेरित कर.

३. हे देवी सरस्वती माते! तू अनंतरुपाने अनंत नावाने या जगतात नटलेली आहे. सरस्वती, गायत्री, शारदा, सावित्रि, लक्ष्मी, पार्वति व तिचे अनंत अवतार यात तूच क्रिडाकरणारी माता आहेस. तू आमच्याकरितां स्तूति करण्यास योग्य आहे व तुझ्याद्वारेच तू आम्हाल सुखी कर. तुझ्या दृष्टीपुढून आम्हाला कधीच दूर ढकलू नको. सदैव तुझी कृपादृष्टी आमच्यावर राहो.

१६. जे या जगताचे उध्दारक आणि मार्गदर्शक लोक आहेत त्या सर्वांना आमच्या या वरुणयज्ञात अथवा वारियज्ञात नैवेद्यरुपाने अर्पण केलेले वेगवेगळे, पक्वान्नाचे चरु स्विकारून आम्हाला सुख शांति समृध्दि दे व आम्हाला उपदेश कर. आम्ही तुमचे स्वागत करतो.

# मंत्र ३२ वा

## शक्तिमाताने थाळ प्रसाद नैवेद्यनो मंत्र
## ( नैवेद्य क्षीर-रोटली तथा चूरमानो मूकवो )
## ( थाळ पर चरणामृत मूकी मंत्रबोली थाळ समर्पणनो संकल्प करवो )

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरु छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

प्रथम आद्यनिरंजन धुंधुकार सृष्टितणो किधो विस्तार. आपे उपज्या ईंड आकार, ईंडमाहे धर्यो अवतार. लीला इच्छा अनंत अपार, तमे निरंजन निराकार. किधा क्रोध ने उंच्या श्वास. निरंजन ते थया प्रकाश. पहेलो शब्द ॐ कार. त्या उपज्या निराकार. हतु तेज ते धुंधुकार. पेदा किधा तत्वचार. चतुरगुण, चतुररंग, चतुरखाण, चतुरवाण, चतुरवेद कर्मधर्मना सर्ज्या भेद. धर्मे तो सर्ज्यो संसार, कर्म तमे कर्यु किरतार. मायाने किधो विस्तार, शक्तिरुपे रच्यो संसार, निरंजने तो कर्तव्य करी. इच्छा लिला प्रगट धरी. सात अस्मानने धरती आकाश, पवन पाणी किधो प्रकाश. अष्टकुळ पर्वत समुद्र सात, नवखंड पृथ्वी द्विपजसात. बारकुळ मेघ नवकुळ नाग. चन्द्र सूर्य मलीया शाख. नवलाख तारा धर्या आकाश. पवनपाणी किधा प्रकाश. नवसो नव्वाणु नदीयो जाण. अडसठ तीर्थ सही प्रमाण. पंधर तीथीने करण बार नवलाख तारानो विस्तार. सरस्वती वनस्पति भार अढार. अग्नि लक्ष्मी सही प्रकाश. चौद लोकमा दिवसने रात. ग्रह नक्षत्र संवत्सर मास. दश खुणाने दश दिक्पाल. शांत स्थाने भितर बाहार. भितर तो सर्ज्यो संसार. बाहार वर्त्यो धुंधु:कार. गुरुनरे धर्यो अवतार. स्वामी तमे ॐ कार. श्रीमत्स्य श्री अेकाऋषि, श्री वामन, श्री सहजानंद, श्रीकृष्ण, श्री वेदव्यास, श्रीनिष्कलंकी नारायण. श्री सद्गुरु स्वामी. तमो जीवोना सृजनहार. ऋषिवर सेवकोना करो विस्तार. आठ लाख करणना अनंत करोडीदेव, चतुरकल्पना देव, नव्वाणु करोडी यक्ष. छप्पन करोड मेघा. बत्रीस करोड किन्नर. तेत्रीस करोड देवताओ पुरो शाख. अने ऋषिवर जीवोने पवित्र करो. रुख्मागंद, अंबरीष, धृव, प्रल्हाद, कमळध्वज, कमळापति, हरिश्चन्द्र, सहदेव युधिष्ठिर, कमळाकुवर, नवनाथ चौर्याशी सिध्द अठ्यायशी सहस्त्र ऋषियो. धाया सतपंथ जाणी जेणे लीधी अथर्ववेदनी वाणी. शक्तिमाया योगिणी जेणे जेर किधा जगत. यति सति सार परजा तारा, मंदोदरी,

चंद्रावती, द्रौपदी, सुरजाराणी तमो धाया सतपंथ जाणी तमाये लीधी अथर्ववेदनी वाणी. अथर्ववेदी सकल शास्त्र संपन्न ऋषीओ, जगतना बधा संत महंत भक्तो. परमात्मानी भक्तीमा लीन थयेला ध्रुव तारा. चार संप्रदाय सात असमान चार भक्त सांप्रदायिक पंथी. दश अवतार स्वामी तमने प्रणाम. निरंजन नारायण तमारे निमित्ते, आलोक परलोक देवलोक महर्लोक अमरापुरीना जळ स्थल महीतळना अधिकारी. पंचभाग थाळ प्रसाद स्विकारो. निरंजन निष्कलंकी अवतार, ऋषिवर सेवकोने दर्शन देजो. सर्व उपस्थित ऋषीवरोनो करो विस्तार, स्वामीजी शक्तिमाता निरंजन निष्कलंकी नारायण. सद्गुरु इमामशाह तमारे भोजनस्थाने मुनिवर ऋषिवर सेवक नरनारी बाळ गोपाळनी थाळ बत्रीसी स्विकारो. तमारी समक्षधर्यु धराव्यु होय ते स्विकारो. तमारे कर्मे, तमारे धर्मे स्विकारो. निरंजन तमारी संगत, गुरु नरनी संगत तमारा अखार परवारनी संगत महादेव प्रथम पुरुषनी संगते तमारी समक्ष मुकेली थाळ स्विकारो. तमारा वारानी संगते थाळ स्विकार करो. गुरु नरनी संगत, गुरुजीना जापनी संगते थाळ प्रसादनो स्विकार करो. समय वेळाना वारानु वर्तमान अथर्ववेदना ज्ञान ध्याननी संगते थाळ स्विकारो स्विकाराओ. श्रीनिरंजन नाम, स्वामी तमे करो जीवोना काम. शक्तिमाता तमने प्रणाम, तमारे सत्संगना संगते थाळ स्विकारो स्विकाराओ. तमारा तेजनी संगते तमारा नामनी संगते, तमारा जापनी संगते थाळ स्विकारो स्विकाराओ. स्वामी मुक्काम वरजागड शहर, जांबुद्वीप कुवारिका क्षेत्रमाहे गुरुजीने किधा ठाम. ते ठाम स्थळनी संगते थाळ स्विकारो स्विकाराओ. साडत्रीस पात्र आडत्रीसमा★ नरनी संगते. तेवीस पात्र चोवीसमा★. नारायणनी संगते थाळ स्विकारो स्विकाराओ. चतुरवेद, चर्तुवाचा चतुर्वंशे शक्तिपरिवार. आद्यशब्द ॐ कारनी संगते थाळ स्विकारो अने स्विकाराओ. स्वामी तमारा कर्या कारव्यानी संगते, स्वामी तमारी इच्छा. स्वामी तमारी लीला. स्वामी तमारा सर्जा सर्जाव्यानी संगते थाळ स्विकारो स्विकाराओ. ब्रह्मा विष्णुना दशेअवतारोनी संगते थाळ स्विकारो स्विकाराओ. स्वामी तमे पवित्र, अमो सेवक चरणरज. नौतमशाख निरंजन तमारी संगते थाळ स्विकारोने स्विकाराओ. अमो सेवको अपराधी. तमे अपराध क्षमा करनार. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम:॥

★ साडत्रीस पात्र आडत्रीसमा नरनी संगते, तेवीस पात्र चोवीसमा नारायणनी संगते.
व्यक्ताव्यक्तगुणोत्तरं सुसुखदं षट्त्रिंशतत्वाधिकं
तस्मादुत्तरतस्तदक्षरमितिध्येयं सदा योगिभि:।
वन्दे तामस वर्जितेन मनसा सूक्ष्मातिसूक्ष्मं परं
शान्तं पंचममीश्वरं प्रतिदिनं सर्वव्यापि तेजोमयम्॥ मणिरत्नमाला श्लोक १० पृ. १४१

दिसणाऱ्या आणि न दिसणाऱ्या गुणाहून श्रेष्ठ, त्याहूनही परसुखदायक अशा छत्तीस तत्वाहून वेगळे सदोतीसावे तत्व ज्याला समजले तो या संपूर्ण तत्वाहूनही पर अक्षर तत्वाचे ध्यान करतो. हे 'अक्षर' नावाचे तत्व ध्यान करण्यास योग्य आणि अनुकुल आहे असे योगी लोक समजतात. सुक्ष्माहूनही अतिसूक्ष्म पण अत्यंत शांत स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण देहाच्या पलिकडे असलेल्या ईश्वरस्वरुप व्यापक आणि तेजोमय निर्मल मनाने प्रणाम करतो. पंचमहाभूत, पंच तन्मात्रा, दहा इंद्रिये, दहा वायु, चार अंत;करण, प्रकृति, पुरुष ही छत्रीस तत्वे आणि सदोतीसावे 'शीव' तत्व आणि अडतीसावे तत्व म्हणजे 'अक्षर' तत्व होय.

निर्गुण निराकार व सगुण साकार भगवंताचे मुख्य अवतारपात्र तेवीस पूर्ण झाले व या कलियुगात अंति श्री निष्कलंकी नारायण हा चोवीसावा अवतार होईल. तो अवतार शुध्द सत्वांश गुणांनी युक्त होईल व जगत्कार्य धर्माची स्थापना करून अधर्माचा नाश करेल.

आता पर्यंत आपण प्रत्येक मंत्रात सृष्टि उत्पत्तिची कथा ऐकली त्याप्रमाणे भगवंताने या मंत्रात सुध्दा कमी अधिक फरकाने सृष्ट्युत्पत्तीचे वर्णन केलेले आहे. अन्य मंत्रात म्हटल्याप्रमाणे या मंत्रात वर्णन आलेले आहे की सृष्टी उत्पत्तीला मुळ कारण म्हणजे माया होय. संपूर्ण भूत प्राणिमात्रांच्या उत्पत्तीलाच कारणमायाच होय. माया दोन प्रकारची आहे अविद्यामाया व तारकमाया. तारकमाया जीवात्म्याचा उध्दार करणारी आहे तरी अविद्यामायेपासून जिव प्राणिमात्राची निर्मिती होते. अविद्यामायेने हे संपूर्ण त्रैलोक्य चौदाभुवने भरलेले आहेत. सावित्री, गायत्री व महासरस्वती ही ब्रह्माची शक्ति आहे. ब्रह्मा आपल्या या शक्तिपासून चौसष्ट कला निर्माण करीत असतात. समुद्रमंथनातून म्हणजे जीवप्राण्याच्या विचारमंथनातून ह्या कला निर्माण होतात. लक्ष्मी मातेपासून विष्णुच्या शक्तिपासून ऐश्वर्य, सुख, समृध्दि निर्माण होते. माता पार्वती, सती वा दुर्गा व महेशशक्तिपासून तमोगुणांच्या अनेक शक्त्या प्रगट होऊन ते संरक्षणांचे जगात कार्य करीत असतात त्यापैकी काही देवतांची नांवे दिलेली आहेत.

**शिवशक्तिची विविध रुपे :-**

महाकाली, उग्रतारा, भुवनेश्वरी, षोडशी, चण्डिका, दुर्गा, चामुंडा, कांति, कालिंका, ललिता, भैरवी, छिन्नमस्ता, धुमावती, मातंगी, बगलामुखी, कमल, जया, विजया इ.

**नवदुर्गा :-**

शैलपुत्री, ब्रह्मचारिणी, चन्द्रघण्टा, कुष्मांडा, कात्यायनी, महागौरी, स्कन्दमाता, कालरात्री, सिध्दीदात्री इ.

**सामान्य शक्ति रुपे :-**

भद्रकाळी, जगदंबा, तुळजाभवानी, अंबाबाई, यमघण्टा इ.

**निकृष्ट शक्तिरुपे :-**

उमीयामाता, मनुबाई, एकवीरा, जखाई, कानबाई, मरीआई, सटवाई, आसरा, म्हाळसा, सप्तशृंगी, ज्वालामुखी, हिंगलाज, गौरी, यमाई, तुकाई, जनाई. इ.

**सतीदेवी :-**

सीता, कुंता, तारामति, द्रौपदी, मंदोदरी, चन्द्रावती, अनुसया, अहिल्या, अरुंधती, रेणुका, सावित्री, रूख्मिणी, सुरजाराणी, मदलसा, दमयंति गौतमी इ.

या संपूर्ण देवदेवता व दिगंत किर्तीच्या सतीमाता या सर्वांना आम्ही नमस्कार करतो. आसन अर्घ्यपाद्याने पूजा अर्चा करतो. हे मातांनो तुम्ही आपापला नैवेद्य भाग स्विकारावा अशा प्रकारची जलाची आहुती त्यांना अर्पण करतो व प्रार्थना करतो की हे मातांनो तुम्ही आम्हाला सुखी धनधान्य संपन्न समृध्द करा. तुमच्या अंगच्या गुणांनी आम्हाला सुरक्षित करा व आमचे त्रिविध ताप निवारण करा.

हे भगवती नारायणी आद्यशक्ति माते! आम्ही सर्वजण तुझीच उपासना करतो. तू ज्योतिस्वरूपी नारायणी ॐ कार स्वरूप आहेस. तू वेळोवेळी वेगवेगळी स्वरूपे धारण करून जगतकार्य केलेस. तुझ्यापासूनच सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ति होते व त्यांचे धारण पोषण सुध्दां तूच करतेस. श्रीमत्स्य, श्री एकाऋषी, श्री वामन, श्री सहजानंद, श्रीकृष्ण, श्री वेदव्यास, श्री निष्कलंकी नारायण, श्री सद्‌गुरु महाराज या सर्वांना जन्म देणारी तूच आहे. या सर्वांनी जगताला प्रज्ञावान करून सोडले, त्या सर्वांची माता तूच आहेस. यक्ष, मेघा, किन्नर, देवता, देव, दानव, व मानव या सर्वांची उत्पत्तिकर्त्री हे आदिशक्ति माया तूच आहेस. रूख्मागंद, अंबरीष, ध्रुव, प्रल्हाद, कमळध्वज, कमळापति, हरिश्चन्द्र, सहदेव, युधिष्ठिर, सद्‌गुरु ब्रह्मा, कमलाकुंवर, नऊनाथ चौर्यांशी सिध्द, अठ्ठ्याऐशी सहस्त्र ऋषी, ज्या सर्वांनी सत्‌धर्माचे आचरण केले, ज्यांनी अथर्ववेदात वर्णिलेल्या अष्टांग योग साधून ब्रह्मविद्या जाणून घेऊन अन्य लोकांना मार्गदर्शन केले त्या महापुरुषांना सुध्दां जन्म देणारी माता तूच आहे. हे शक्तिमाते योगिनी स्वरूप तू आहेस. ज्यांनी या जगताला तुच्छ मानून संसार भोगाच्या पलिकडे निघून गेले, असे योगी, यति, संन्यासी, उदासी यांना सुध्दा जन्म देणारी तूच आहे. सति, सीता, कुंता, तारा, रेणुका, मंदोदरी, मदालसा, चंद्रावती, द्रौपदी, सुरजाराणी वगैरे अनेकानेक सतींना जन्मास घालणारी माता हे भगवती तूच आहेस. या सर्वांनी अथर्ववेदातील ब्रह्मविद्या संपादन केली, त्या सत्‌धर्माप्रमाणे वागल्या व त्यांच्या उदरी दिगंत किर्तीचे महापुरुष जन्मास आले. चार संप्रदाय आर्त अथार्थी जिज्ञासु ज्ञानी वगैरे भक्तिमार्गाचे वेगवेगळ्या संप्रदायांचे प्रणेते अनेकानेक संत, महंत, महापुरुष, मृत्युलोकातील, दानव लोकातील, देवलोकातील, महर्लोकातील, अमरापुरीतील अधिकारी पुरुष तुम्ही सर्वआपापल्या परिवारातील सत्पुरुष हो! आमच्या या भोजनगृहात येऊन निरनिराळ्या थाळांनी (चरूंनी) भरलेल्या नैवेद्याचा स्विकार करा. सद्‌गुरु इमामशाह महाराज या सर्वांना विनंती करून त्यांना नैवेद्य अर्पण करण्याचा आग्रह करीत आहे. कारण संपूर्ण देवी देवता तृप्त झाल्याशिवाय त्या मानवाला तृप्ती पुष्टी देऊ शकणार नाही. म्हणून हे मातांनो तुम्ही आपला हवीर्भाग नैवेद्य स्विकारा व स्विकारण्याचा सर्वांना आग्रह करा हे शक्तिमाता तुला नमस्कार असो. तुझ्या तेजस्वी वाणीच्या योगाने, तुझ्या नामाच्या, जापाच्या संगतीने स्विकार कर. जांबुद्विपात भरतखंडात कुवारिका क्षेत्रात गुरुजींनी जे स्थान बनविले त्या क्षेत्राच्या संगतीने श्री निष्कलंकी नारायणाच्या संगतीने थाळ प्रसादाचा स्विकार करावा. चारवेद, चारवाणी, चतुर्दश शक्ति परिवार आद्य शब्द ॐ काराच्या संगतीने थाळ स्विकारो. हे भगवती माते तुझ्यात आणि आमच्या अंतरात वसलेल्या स्वामीत कोणत्याच प्रकारचे अंतर नाही. तुझी

इच्छा, तुझी लीला, तुझी सर्जनशिलशक्ति, तुझी धारण पोषण शक्ति, तुझी सर्व संहारक शक्ति व तुझी नविन शरीर देणारी शक्ति या सर्वांना आम्ही थाळ नैवेद्य प्रसाद अर्पण करतो. आम्ही अपराधी आहोत तुम्ही आमचा अपराध क्षमा करा. आम्हाला सुख शांति, आनंद द्या, आम्हाला ज्ञानाचा उपदेश करा व त्रिविध तापातून आमचे संरक्षण करा.



यानावह उशतो देव देवांस्तान्प्रेरय स्वे अग्ने सधस्थे।
जक्षिवांसः पपिवांसो मधून्यस्मै धत्तः वसवे वसूनि ॥३॥
सुगा वो देवाः सदना अकर्म य आजग्मेदं सवने मा जुषाणाः।
वहमाना भरमाणाः स्वा वसूनि वसुं धर्मं दिवमा रोहतातु ॥४॥
यज्ञ यज्ञं गच्छ यज्ञपतिं गच्छ। स्वां योनिं गच्छ स्वाहा ॥५॥
एष ते यज्ञो यज्ञपते सहसूक्तवाकः। सुवीर्यः स्वाहा ॥६॥

अथर्व ७/९७/ ३ ते ६

अपूपवान घृतवांश्चरुरेह सीदतु। लोककृतः पथिकृतो।
यजामहे ये देवानां हुतभागा इह स्थ ॥१९॥
अपूपवानन्नवांश्चरुरेह सीदतु। लोककृतः पथिकृतो।
यजामहे ये देवानां हुतभागा इह स्थ ॥२१॥

अथर्ववेद १८/४/१९-२१

३. अग्नि हा यज्ञातील सर्व देवांना घेऊन येणारा आहे. हविर्भाग देवांनी ग्रहण केल्यानंतर त्यांना आपल्या स्वस्थानी पोहोचविणारा सुध्दा अग्नीच आहे. सर्व देवांनी आमच्या भोजनस्थानी यावे, सर्वांनी अन्न ग्रहण करावे, अमृतरस प्राशन करावा आणि आम्हाला सुखी, समृध्द करावे.

४. हे देवदेवतांनो! हा यज्ञ तुमचे घर आहे. या ठिकाणी अमृतरस चाखण्यास यावे आणि सर्वांनी आम्हास संरक्षणाचा आशिर्वाद द्यावा, धनधान्य संपन्न करून मग आपापल्या स्थानी जावे.

५. हे पूजनिय पुरुषांनो! आम्हाला पूजनीय व्यवहार करण्यास पात्र करा आणि सुंदर वाणी 'वेदवाणी' च्या संगतीने आम्हाला सन्मार्गाचे मार्गदर्शन करवा.

६. हे पुजनीय व्यवहार पालन करणाऱ्या महापुरुषांनो! सुंदर देववाणीच्या रुपाने आमचे आचरण शुध्द व्यवहारमय व्हावे म्हणून आम्ही तुझी उपासना करीत आहोत.

१९. निर्मल शुध्द सात्त्विक अन्नाने भरलेले हे अमृतचरु हे देवतांनो तुम्ही स्विकारा. मानव समाज निर्माण करणाऱ्या भगवंता! तू या मानवसमाजास उत्तम प्रकारे गुण देऊन त्यांची उन्नति कर. तशाप्रकारची बुध्दि त्यांना दे व त्यांना विद्वान करून सोड.

२१. आम्ही पवित्र शुध्द रितीने शिजविलेले अन्न खीरपुरी, मालपुआ गहू, जौ, तांदूळ, दुध, साखर वगैरे पदार्थांनी तयार केलेले अन्न तुम्ही सेवन करा व आपला कृपाप्रसाद आम्हाला द्या. तुमच्या मार्गदर्शनाला आम्ही मानतो, पूजनीय, वंदनीय मानतो. तुम्ही आमचे त्रिविध ताप निवारण करा.

# मंत्र ३३ वा

## सर्वदेव ऋषिवरोने थाळ जमाडवानो मंत्र. (बारेराशी) दशांश पैसानो मंत्र.
## (थाळपर चरणामृत मूकी, मंत्र बोली थाळ समर्पणनो संकल्प करवो.)

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरु छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्वामीजी हरिवंश पात्र, जीवोना आधार. सृष्टीना सृर्जनहार. जांबुद्विपे तमे धर्यो अवतार. तमे अविंचल तमारी वाचा अविंचळ. तमारु आसन अविंचळ. तमे स्थान स्थानकनाधणी. तमे रचना रंची चौद भुवनतणी. तमारी पारे, तमारे निमित्ते तमारे भोजनस्थाने, तमारे मंदीरे, तमारी जग्याये जे कोई मुनिवर सेवक हिणो खिणो स्त्रीपुरुष, जे कोई मननी इच्छाये तमारा भंडारमा भावे करीने तमारे रसोडे जे कोई सेवके भान्यु इच्छु होय. जे कोई सेवको दमडो दोकडो, सूत्र वस्त्र, कणकाकण, दाणो, खाणु, तांबु, रुपु, ढबुपैसो, हेम कुंदन, दाम महोर कोडी बदाम, रुपानाणु, अन्नपाणी, पान, फुल, फळ, शाक, पाक, प्रसाद, जे कोई सेवक तमारे दरबारे भावथी गतगंगामा पूजे आशिष करावे ते स्विकारो. आशिष करावे ते बारे राशीनी वासने स्विकारो स्वामीजी सेवकोना अन्नपाणी मोकळा करो. अन्नपाणीना भंडार अखूट करो. खेती कमाईमा लाभ आपो. वाटघाट सोहेली करो. दुःख दोहेला दूर करो. ऋषिवर सेवको उपर दया दृष्टी करो. सेवकोनी खेतीवाडी वणज वेपारमा लाभ पूरो. आव्या विघ्न दूर करो. अेक गणु दान सव्वालाख गणु पुण्य. अेकवार दान ऋषिवर दे ते सवालाख गणेरु ले. स्वामी सतगुरु पात्र ब्रह्मा ईन्द्र इमामशाह तेनी शाख भरे. निरंजन निष्कलंकी नारायण आण धरे. हरिअंशपात्र स्वामी निष्कलंकी नारायण अवतार आद्यविष्णु तमे सेवकोनी रक्षा करो. सेवकोनी पूजापात्री स्विकारो, सेवकोना नियमे धर्मे सतपंथना मार्गमाहे भर्या पुर्या राखो. दशांश सुक्रीतना मेळा आपो. गतगंगामा भेळा राखो पंचभाग स्विकारो, मेरु समान दान विश्वंभरा भोजन स्विकारो, पृथ्वी प्रदक्षिणानु फळ आपो.

**ऋषिवर सेवकोना पाप कापो. फळंतर वेळाये उगारी लेजो, छेवटनी पळे दर्शन देजो, धर्म अखंड राखो, पाच, सात, नऊ, बार तेत्रीस करोडीना मेळा आपो. लक्ष चौर्यायशीना फेरा टाळो कमळाकुंवरनी संगतमा राखो. दशे आंगळीये दान सहस्त्र गणुपुण्य. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥**

हे भगवंता तू अपार जीव प्राणिमात्रांनी सृष्टी निर्माण केली. त्यांत हरिअंश असलेल्या सद्भक्तांना आपल्या अंगच्या गुणांनी युक्त केलेस. जांबुद्विपात तू अवतार धारण करून सद्भक्तांना सन्मार्गाप्रमाणे वागण्याचा उपदेश कर. तू अविंचल अचळ आहेस. तूझी वाचा अविंचल आहे. तुझे आसन सुध्दा अविंचल आहे. हे भगवंता! स्थानास्थानांतरात तू वेगवेगळ्या विभुतींनी वसलेला आहेस. या चौदाभुवनात तुझी वेगवेगळी रुपे व रचना आहे. हे भगवंता तुझा पार लागू शकत नाही. हे स्वामीन्! तुझ्या निमित्ताने, तुझ्या भोजनगृहात, तुझ्या मंदीरात, तुझ्या भंडारगृहात जे कोणी मुनिवर, सेवक, क्षिणव्यक्ति, स्त्री अथवा पुरुष, जे कोणी मानसिक इच्छेने प्रेरित होऊन, तुमच्या भंडारात भावभक्तिने जे काही अर्पण केले असेल ज्या कोणी सेवकांनी मानलेले असेल, इच्छिलेले असेल ते तुम्ही स्विकार करा. ज्या कोणी सेवकांनी दमडी, दोकडी, सूत्रवस्त्र, कणातील कण, अन्नाचे दाणे, खाणीतील वस्तु, तांबे, चांदीचे शिक्के, ढबुपैसा, सोने, कुंदन, दाम मोहर, कवडी, बदाम, रुप्याचे नाणे, अन्नपाणी, पान, फुल, फळ, शाक, पकविलेले पदार्थ, प्रसाद जे कोणी सेवक तुमच्या दरबारात भक्तिभावाने येऊन गतगंगेत अर्पण करील व गतगंगेचा आशिर्वाद मिळवून स्विकारेल. गतगंगेच्या म्हणजेच भगवंताच्या आशिर्वादाने संपूर्ण बारा राशीचे जीवात्मे पूर्ण तृप्त होवो. भगवंता या दीनदासाचे अन्नपाणी आपल्या कृपाप्रसादाने पूर्ण करा व मोकळे करा. अन्नपाण्याचा भंडार अखूट करा. या सेवकांच्या शेतीत उद्योग व्यवसायात वाढ करून लाभ करा. या सेवकांची वाट-घाट सुलभ करा. दु:खदारिद्रय दूर करा, या ऋषिवर सेवकावर दयेची दृष्टि करा. या सेवकाने एक दाणा जर दान केला तर अनंत पटीने त्याचे फळ प्राप्त होते. सद्गुरु पात्र ब्रह्मा, इन्द्र इमामशाह त्याची साक्ष भरेल, निरंजन निष्कलंकी नारायण त्याची आण धरेल. या सेवकांचे संरक्षण करा. या सेवकाची पूजा पात्री स्विकारा. या सेवकाला तुमच्या नियमधर्मात सत्पंथात कायम ठेवा व या मार्गाचे आचरण करून हा जिवात्मा सत्पंथाचे पुरेपुर आचरण करील अशा प्रकारची बुध्दि यास द्या. दसवंत सुक्रीतचा मेळा या जीवात्म्यास द्या. सदैव या गुरुगंगेत हा जीवात्मा येईल अशा प्रकारची बुध्दि यास द्या. दसवंत सुक्रीतचे दान हे मेरु शिखराप्रमाणे सर्वश्रेष्ठ अतिउत्तम असते. या जीवात्म्यास विश्वंभर भोजनाची सद्बुध्दि द्या, पृथ्वीप्रदक्षिणेचे फळ यास द्या. या मुनिवर ऋषिवर जिवात्म्याचा संपूर्ण पाप परिमल धुऊन यास स्वच्छ करा. शेवटच्या क्षणी या जीवात्म्याचे लक्ष केवळ भगवंत स्वरूपातच राहिल अशी मति यास द्या. याचा धर्म अखंड राहू द्या. लक्ष्य चौर्यायशीचा फेरा मिटवा. कमळाकुवरच्या संगतीत या जीवात्म्याचा उध्दार करा. दहाही बोटानी जी धनसंपत्ति हे भगवान माझ्याकडून कमविली गेली असेल ती तुला अर्पण असो.

★ टिप - दसवंत सुक्रीतचा खुलासा

न्यायोपार्जितवित्तस्य दशमांशेन धीमता।
कर्तव्यो विनियोगश्च ईश प्रीत्यर्थ मेवच॥
स्कंदपुराण-माहेश्वर खंड - केदारखंड १२/३९

स्वकष्टार्जित सचोटीची जी आपण कमविलेली धनसंपत्ति असते. त्यातून दहावा भाग धर्मदायात खर्च करावा ती दसवंत (दशांश) होय. जिथे अन्नसत्र, अनाथालये, लहान-प्रौढ लोकांना व तरुणांना सुसंस्कार देणाऱ्या ज्या संस्था आश्रम आहेत अशाठिकाणी हा धर्मदाय केला जातो. ज्याठिकाणी त्याचा विनियोग नितीनियमाने सुयोग्य रितीने होत असेल, जिथून सुसंस्काराचे सत्साहित्य प्रसिध्द होत असेल अशा मंदिरात देवालयात हा दशांशभाग धर्मदाय म्हणून अर्पण करावा व सुक्रीत म्हणजे गुरुचा भाग गुरुचरणी अर्पण करावा तो चाळीसावा भाग असतो. अशा रीतीने दसवंत सुक्रीत हिशेबाप्रमाणे काढणे अथवा त्यापैकी काही भाग सद्‌गुरु चरणी अर्पण करावा हा सतपंथाचा पहिला दंडक आहे. जो हे अर्पण करणार नाही व स्वत:करिताच केवळ धनसंपत्तीचा उपभोग घेतो तो पापभक्षी जीवात्मा समजावा. तशा मनुष्यास दु:ख, दैन्य, चंचलता, दुर्व्यसन, पापाचार, घरात कंकास, अशांतता होते. त्याच्या धनसंपत्तीला बरकत राहात नाही. सुख शांति समाधान हरवून तो जिवात्मा दु:ख भोगतो.

यत् ते नाम सुहवं सुप्रणीतेऽनुमते अनुमतं सुदानु।
तेना नो यज्ञं पिपृहि विश्ववारे रयिं नो धेहि सुभगे सुवीरम् ॥४॥
एमं यज्ञमनुमतिर्जगाम् सुक्षेत्रतायै सुवीरतायै सुजातम्।
भद्रा ह्यस्याः प्रमतिर्बभूव सेमं यज्ञमवतु देवगोपा ॥५॥
अथर्व. ७ अनु २ सुक्त २० मंत्र ४-५

उच्छिष्टे नाम रुपं चोच्छिष्टे लोक आहितः।
उच्छिष्ट इन्द्रश्चाग्निश्च विश्वमन्तः समाहितम् ॥१॥
अथर्व ११ अनु ४ सुक्त ७ मंत्र १

४. हे उत्तम नीतिवाली किंवा उत्तम प्रकारे चालणारी बुध्दि! तुझे नाव चांगल्या प्रकारे आदरणीय व उत्तम दानी मानले जाते. निरंतर तुझे नाम सर्वश्रेष्ठ पदार्थाहून सर्वश्रेष्ठ आहे. हे वरणीय सुंदर तुझ्या अंगच्या गुणांनी आम्हाला यश दे व आमचे पूजनीय व्यवहार पूर्णत्वास ने. हे सुंदर ऐश्वर्यसंपन्न माते आम्हाला विरोचित धन दे.

५. हे अनुकुल बुध्दि अत्यंत प्रसिध्द अशा आमच्या यज्ञासंबंधी व्यवहारात तू उत्तम भूमिका व अनुकुल साहसी वीरांची प्राप्ति करून देणारी आहेस. तीच अनुग्रह बुध्दी आमच्या सर्वांचे कल्याण करणारी तीच विद्वान रक्षकांची रक्षण करणारी शक्ति आमच्या पूजनीय हिताचे रक्षण करो.

१. सर्व देवदेवतांनी नैवेद्यप्रसाद ग्रहण केल्यानंतर बाकी राहिलेला कृपाप्रसाद अवशेष रुपाने राहिलेला आत्मब्रह्माच्या नामात व रुपात वसलेला आहे. त्यात संपूर्ण त्रैलोक्य वसलेले आहे. त्यात इन्द्र, अग्नि तसेच अनंत विश्व सामावलेले आहे.
(शेष भागात उत्पत्ति व प्रलय यातून वाचलेला अनंत परमेश्वर आहे. जगतातील नाम आणि रुपाहून पर अशा परमात्म्याचे स्वरूप संपूर्ण दृष्यमान स्थितीहून वेगळे आहे. जगदीश्वरात मेघ, अग्नी, सूर्य सामावलेला आहे.)

## मंत्र ३४ वा

## अक्षयपात्रनो थाळ प्रसादनो मंत्र-भगवती अन्नपूर्णानो मंत्र

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरु छुं. जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा ईन्द्र, इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे.

हरि, चतुर्वेदीब्रह्मा, मोक्षदातार देव महेश्वर, सहदेव तपी कसे कळश किरतार, चार जुगमध्ये जीव उध्दार्या. पाच, सात, नव, बार, तेत्रीस करोडी अनंतना मेळा आपो. तमो हरिअंश पात्र स्वामीजी, भावभक्ति शुध्द करो. थाळ प्रसाद मेहेमानी दशांश सुक्रीत, दाम दोकडो, पान, फुळ, फळ, अन्नपाणी, शाक, पाक, स्तुति स्विकारो. स्वामी तमसु बलिहारी, अमने आशा छे देव तमारी. अक्षयपात्र अखूट करो. स्वामी तमे गतगंगामा तेज रुपे परवर्यो. अन्नपूर्णा अन्नपुरो पाणी पुरो गणेश. रिध्दिसिध्दी आपो माता भवानी, महादेवस्वामी. भोजन पीरसे माता भवानी, माता भवानी गया ब्रह्माजीनी पास, रिध्दिसिध्दि आपो तमारा दासने, भरो भंडार थईने सुखी अन्नदेव पूर्ण जळधर मुखी,
सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः ।।

श्रीहरी हा सद्भक्तांचाच कार्य पण संपूर्ण भूत प्राणिमात्रांचा संगोपन म्हणजे पालनपोषण व संरक्षण करणारा आहे, प्रजापिता ब्रह्मा जीवप्राणिमात्रांना जन्मास घालून मानव मात्राला चतुर्वेदाच्या रुपाने ज्ञान देणारा आहे. आणि महेश्वर भगवान सर्व भूतप्राणिमात्रांच संहार करणारा व लय करणारा आहे. म्हणजेच मोक्षपद देणारा आहे. अशा प्रकारची त्रिदेवांची भूमिका रचना निर्गुण निराकार. सगुणसाकार तेजस्वरूप ज्योतिस्वरूप भगवंताने केलेली आहे. जगतात सद्भक्तांना मार्गदर्शन करणारे आधिकारिक कोटीतील जीवन्मुक्त महात्मे जगतातील लोकांना ज्ञान दान करणारे ब्रह्मस्वरूपी महापुरुष अवतार धारण करून अज्ञ जनांना ज्ञान दान करीत असतात व त्यांचा उध्दार करीत असतात. सत्ययुगात तपश्चर्येला प्राधान्य असल्याने तपस्येने जीवनातील सर्व सुखे प्राप्त करून घेत असत. त्रेतायुगात यज्ञयाग होमहवन करून देवदेवतांना

प्रसन्न करून त्या देवता निरनिराळ्या रुपाने जीवात्म्यांना सौख्य शांति आनंद देत असत, पर्जन्यातून अन्नधान्य, धन संपत्ति वैभव संपन्न करीत व ब्रह्मज्ञान शिकवून संरक्षण करीत असत. द्वापारयुगात ज्ञान दान देऊन, ज्ञान ग्रहण करून ते आत्मसात करून दुसऱ्या अन्य अज्ञानी लोकांना मार्गदर्शन करून ब्रह्मज्ञानी करीत असत म्हणून त्या काळात वेगवेगळे धर्मग्रंथ निर्माण झाले. या कलियुगात सद्गुरु ब्रह्माच्या तपश्चर्येने जीवप्राणिमात्रांचा उध्दार होण्याकरीता घटपाट कलशपूजा हा मार्ग सद्गुरुब्रह्मांनी आखलेला आहे. या कलशपूजेच्या माध्यमातून ईशसाधना करून, भगवंताचे नामस्मरण करून मानवमात्राची सेवा करता येते. म्हणून कलियुगात नामस्मरण व सेवा हे फार महत्वाचे साधन आहे. नामस्मरण, जप, पूजा, ध्यान, सेवा, परोपकार बुध्दि, समाजसेवा करून मनुष्य आत्मोध्दार करू शकतो. गतगंगा सेवा हीच ईश्वर सेवा होय. गुरु गतगंगेत मानव मात्रांची सेवा करता येते. एकमेकांचे सुख दुःखाची विचारपूस करून एकमेकांना सहायता करता येते. परोपकार परहिताची जोपासना करता येते. पाच, सात, नऊ आणि बारा अशा तेहेतिस कोटी देवांची सेवा उपासना पूजा करता येऊन अनंत करोडी जीवात्म्यांची सेवा केली जाते. सतपंथ तत्त्वानुसार भावभक्तिने जो जीवात्मा गतगंगेत येऊन शुध्द पवित्र होतो. त्या जीवात्म्याने अर्पण केलेला थाळ प्रसाद नैवेद्य हे भगवंता तुम्ही स्विकारा. या जीवात्म्याने अर्पण केलेली दसवंत, सुक्रीत, रोकडपैसा, दोकडा, पान, फूल, फळ, अन्नपाणी, शाकपाक, स्तुति आपण स्विकारावी. हे स्वामीन्! बलिहारी तुझ्या नावाची की आम्ही जिवात्मे अत्यंत अल्प बुध्दिने व संकुचित वृत्तीने तुला किंवा तुझ्या दरबारात अर्पण करतो पण पूर्ण मानून तू ते पदरात घेतोस. आमच्या आशा आकांक्षा पुरवितोस, आमचा भंडार अखूट ठेवतोस. आमचे अक्षय-पात्र अन्नपाण्याचा भंडार अखूट ठेव. स्वामी! तुम्ही या गुरुगतगंगेत तेज रुपाने रहा. हे अन्नपूर्णा माते! तुझ्या या भंडारात अन्नाचा पुरवठा सातत्याने कर. हे माते! तुझा हा अन्नपाण्याचा भंडार अखूट ठेव. हे भगवान गणेश देवा! तुझ्या ऋध्दि आणि सिध्दि ह्या पत्न्या आहेत. त्या आमच्या माता आहेत. हे ऋध्दिसिध्दि मातांनो माता भवानी रुप तू आहेस ज्या प्रमाणे माता भवानी महादेवाला भोजन वाढते, त्याप्रमाणे या तुझ्या बालकाला सुध्दा भोजन वाढ. हे माते तू ब्रह्माची पुत्री आहे. तुझा पुत्र गणेश हा संपूर्ण भूतांचा स्वामी आहे. रिध्दि सिध्दि ह्या तुझ्या पत्न्या आहे. हे भगवती स्वरूप माता भवानी हे नारायणी स्वरूप ऋध्दिसिध्दी मातांनो तुम्ही आमच्या अन्नपाण्याचा भंडार अखूट ठेवा. हे अन्नपाणी देवता, तुम्ही आम्हाला सुखी ठेवा. हे जळधर देवतांनो तुम्ही आमच्या सुखाकरीता वेळोवेळी पर्जन्य रुपाने वृष्टि करा. या जगतात आम्हाला सुखसंपन्न धनधान्य संपन्न समृध्द करा व आमचे संरक्षण करा.

❋ ❋ ❋ ❋

य आत्मदा बलदा यस्य विश्व उपासते प्रशिषं यस्य देवाः।
यो इस्येशं द्विपदो यश्चतुष्पदः कस्मै देवाय हविषा विधेम ॥१॥
यः प्राणतो निमिषता महित्वको राजा जगतो बभुव।
यस्यच्छायामृतं यस्य मृत्युः कस्मै देवाय हविषा विधेम ॥२॥
यं क्रन्दसी अवतश्चस्कभाने भियसाने रोदसी अह्वयेथाम्।
यस्यासौ पन्था रजसो विमानः कस्मै देवाय हविषा विधेम ॥३॥

अथर्व. कां. ४ अनु १ सुक्त २ मंत्र १ ते ३

ॐ भूर्भुवः स्वः तत्सवितुर्वरेण्यम् भर्गो देवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात्॥

ऋग्वेद मंडळ ३२ सुक्त ६२ मंत्र १०

१. जो प्राण आत्मबल देणारा किंवा शुध्द करणारा आहे, शारिरीक बल देणारा वा शुध्द करणारा आहे. ज्या व्यापक व पूजनिय, उत्तम शासन करणारा, सूर्य चन्द्रादि सर्व देवता ज्याची सेवा करतात जो व्यापक, पूजनीय द्विपद वा चतुष्पद यांचा ईश्वर आहे, त्या प्रजापति सुखदायक परमेश्वराची दिव्य गुणा करीतां भक्तियुक्त अंत:करणाने आम्ही सेवा करतो.

२. जो परमात्मा आपल्या महिमेने श्वास घेणाऱ्या चेतन व डोळे बंद केलेल्याअचेतन जगताचा एक राजा आहे ज्याची छाया कान्ति अथवा ज्ञानरूप आहे व अमरपद पुरुषार्थ जीवन सफळता वा मोक्षपद आहे, ज्याची छाया-अज्ञान मरणरुप आहे मरण म्हणजे शरीरत्याग निरूत्साह किंवा जीवनाची विफलता नरक आहे. त्या प्रजापति सुखदाता परमेश्वराची श्रेष्ठ गुणांकरितां भक्तियुक्त अंत:करणाने आम्ही सेवा करतो.

३. ज्यांना परस्पर अडविणारी व ललकारणारी दोन सेना प्राप्त होते, ज्याच्या भीतीने सूर्य आणि भूमिने मदतीकरीता बोलाविले आहे, ज्याचा मार्ग जगताच्या विविध प्रकाराने गणला जातो किंवा विमानरुप आहे त्या प्रजापति सुखदाता परमेश्वराची उत्तम गुणाकरितां भक्तियुक्त अंत:करणाने आम्ही सेवा करतो.

१०. ज्या परमेश्वराने सृष्टीचे सृजन केले आहे आणि ज्याचे आम्ही ध्यान करतो, त्या पूजनीय परमेश्वराचे संपूर्ण पाप आणि अज्ञान दूर करण्यांकरिता उपासना करतो तो आमच्या बुध्दिला प्रेरणा देवो.

# मंत्र ३५ वा.

## गायत्रीनो मंत्र ( कलियुग मंडयाननो मंत्र.)

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा ईन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

आ कलजुगनो मंडाण मंडते हो स्वामी, काल नाम संवत्सरे वैशाख शुध्द बीजे शुक्रवारे मुळ नक्षत्रे ते दिने कलियुग प्रवर्तते हो स्वामी. कलियुग मध्ये गुप्त अवतार लखते हो स्वामी. गुरु तो सद्गुरु ब्रह्मा, शक्ति तो आद्यशक्ति, स्थान तो दिलमदेश, क्षेत्र ते पंचनदी मुलस्थान. निर्दाळत दानव कालिंगो चांडाल. उच्चारता अथर्ववेद, उध्दरते गायत्री, ॐ नमो निष्कलंकी नारायण जनार्दनाय। भस्मायुधाय विद्महे दिव्यनेत्राय धीमहि। तन्नोज्वरहर: प्रचोदयात्। आज वर्तते भरतखंडे जांबुद्विपे कुवारीका क्षेत्रे, अजीया उध्दरते साद सुनते पाप हनते वैरी मरते मोक्ष लंभते श्री सतगुरू नमो नम: गुप्त अवतार नव, प्रगट अवतार अेक श्रीनिष्कलंकी नारायण. ओराधिक तो श्री सद्गुरु, वेद तो अथर्ववेद, दर्शन अेक जतसत्, मेघ दुर्मेघ, चतुरखाण स्वेदज, अंडज, जारज, उद्बीज, यज्ञ अेक अजामेध व्रत अेक शुक्रवारी बीज चन्द्रदर्शन दत्त अेक लोखंड, प्रणाम अेक हेजंदा, दाग अेक भोमदाग, फल प्राप्तते मिथुने, धर्म विश्वा अर्धो, पाप विस्वा साडा ओगणीश, कलीयुग मध्ये छत्रीस करोडी नियम धारी, तेमा बार करोडी परळोगता, बार करोडी आवागमन, बार करोडी मोक्ष मुगता. परमपद अमरापुरी गता. भावे प्रसादे सतपंथ ते सदा उत्तम भवोभवे हो स्वामी. कलियुगनो प्रमाण चार लाख बत्रीस हजार वरसनो छे. कलियुगना अन्ते निष्कलंकी नारायणना प्रतापे अनंत करोडीना भरणा कमलाकुवरना शिरभरासे.
सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम:।

ॐ ॐ ॐ कारं कल्यंग कर्ता, विशांतिविस्वा पापं, विश्व धर्म अरूध्दं पातकं धर्मो रेखामात्रधर्म इति परिब्रह्म: अथर्ववेद: श्वेतवर्ण: वर्णादि: विष्णु सविष्णु नारायण: ब्रह्मांगम् ब्रह्म वंशादि पात्र: वर्णादि धर्मो मेंच्छो अभ्युज्जगति इच्छांगो विष्णुर्नारायण: अत: परिवक्ष्यामि महायज्ञभेदं जंबुद्विपे कलांगं। पवित्र वर्तमानं महाकलियुगे उपजायन्ते नारायण: तेजोभविता अंगकर्ता प्रज्वालयति पातकं अनादि पुरुष: मन जीवन भवति। आर्यांगं परिब्रह्म: षड्लिलांगं मंगलश्च सत्वानि सत्यात्राहि परमेश्वर: परिब्रह्म: अनादि पुरुष वेलांगं भवति कर्मायति परिब्रह्म: स्थले सेवांगं नम: सर्वेति परिब्रह्म:

परमेश्वर: परिब्रह्म:। ॐ नमो निष्कलंकी नारायण जनार्दनाय। भस्मायुधाय विद्महे दिव्यनेत्राय धीमहि तन्नोज्वरहर: प्रचोदयात्।

ॐ शांति: शांति: शांति: !

काल नाम संवत्सरात वैशाख शुध्द बीजेच्या दिवशी शुक्रवारी मुळ नक्षत्रावर कलियुगाची सुरुवात झालेली आहे. (चैत्र वद्य अमावशा बुधवार, गुरुवारी पूर्ण प्रतिपदा व शुक्रवार चंद्रदर्शन बीज या दिवशी कलियुगाचे मंड्याण मांडले जाऊन सुरुवात झालेली असल्याने शुक्रवार चन्द्रदर्शन ही कलियुगाची युगतिथी आहे.) कलियुगात भगवंताचे अनेक गुप्त अवतार झालेले असून सद्गुरु ब्रह्माचे सुध्दा संत महात्म्याच्या रुपाने अनंत गुप्त अवतार झालेले आहेत. अवतार कार्यकरणारी आद्यशक्तिचे सुध्दा अनेक गुप्त अवतार झालेले आहेत. कलियुगात अवतार पात्राचे प्रागट्यस्थान दिलमदेश आहे तसेच क्षेत्र पंचनदी मुलस्थान (पंजाबमधिल मुलतान जवळ) आहे. त्याठिकाणी कलियुगात नेमला गेलेला चिनदेशातील दैत्य कालिंगाचा निष्कलंकी नारायणाशी संग्राम होऊन दैत्य कालिंगाचा व त्याच्या सर्व साथीदारांचा संहार होईल. कलियुगात प्राधान्यभूत असलेल्या अथर्ववेदानुसार असलेल्या मंत्रानुसार गायत्री मंत्राचा जाप सर्वश्रेष्ठ आहे. "ॐ नमो निष्कलंकी नारायण जनार्दनाय" हा षोडश अक्षरीमंत्र कलियुग तारक मंत्र असून निष्कलंकी गायत्री मंत्र "भस्मायुधाय विद्महे दिव्यनेत्राय धीमहि। तन्नोज्वरहर: प्रचोदयात।" हा आहे. त्याचा अर्थ असा आपल्या बुध्दिच्या बळाने व दिव्यज्ञानयुक्त दृष्टिने भस्मिभूत असलेल्या संसारास जाणून त्यापासून सावध राहा. हे निष्कलंकी नारायणा तू आपल्या दिव्य तेजाने ज्वरहरण करणाऱ्या आमच्या बुध्दिस प्रकाशित कर. आमच्या त्रिविध तापांची शान्ति होवो. आज कलियुगात हा कलितारक मंत्र असून मोक्षपद प्राप्त करून देणारा आहे. भरतखंडात जांबुद्विपात कुवारिका क्षेत्रावर असलेल्या सद्गुरु श्री इमामशाहांच्या स्थानात याच दिव्य मंत्राच्या श्रवणाने व आत्मज्ञान यज्ञाच्या प्राप्तिने जीवात्म्याचा पापपरिमल नाहिसा होऊन जन्मजन्मांतराचा उध्दार होत असतो. निष्कलंकी नारायणाची आराधना करणाऱ्या सद्गुरु श्री इमामशाहांनी सद्भक्तांकरिता अथर्ववेदानुसार मुक्तिमार्ग दिग्दर्शित केलेला आहे. सत्पंथ दर्शन अथवा केवलसत् दर्शन हे ह्या मुक्तिमार्गाचे नाव आहे. या कलियुगात दुर्मेध नावाचा मेध वृष्टीकरणारा आहे. म्हणून केव्हा अतिवृष्टी तर केव्हा अनावृष्टि होत असते. या कलियुगात स्वेदज, ईंडज, जारज, उभ्दीज खाणित चौर्यायशी लक्ष जीव योनि विभागलेल्या आहेत. या कलियुगात आत्मज्ञानयज्ञ सर्वात श्रेष्ठ व अप्रतिम यज्ञ आहे. व्रत शुक्रवारचे चन्द्रदर्शन (अजवालीबीजेचे) होय. दान देण्याचे साधन लोखंडाचे आहे. प्रणाम करण्याचे साधन 'हे जंदा' होय, दाग म्हणजे मृतशरीर नष्ट करण्याचे साधन भुमिदाग होय. मनुष्य जीव प्राणिमात्रांची उत्पत्ती मैथुनजन्य सृष्टीने होते. या कलियुगात साडेएकोणावीस विस्वा पाप म्हणजे साडेसत्ताण्णूव टक्के पाप कर्म व्यापलेले आहे तर पुण्यकर्म केवळ अडीच टक्के आहे तरी सुध्दा सत्याने वागणाऱ्याची नाव भवसागरात डळमळते पण बुडत नाही. सदगुरु त्या जीवात्म्याचे नावाडी होऊन त्याची जीवननौका सुरक्षित ठिकाणी पोहोचवित असतात. या कलियुगात एकूण छत्तीस करोडी जीवात्म्यांना नितीधर्म नियमांची दिक्षा दिली जाईल. त्यातील बारा करोडी जीवात्मे मोक्षगतिला प्राप्त होतील. बारा करोडी

जीवात्मे आवागमनाच्या फेऱ्यात पडतील तर बारा करोडी जीवात्मे अश्रध्देत राहून नितीनियम वगैरे शास्त्रांच्या गप्पा आहेत खाणे, पिणे, आनंद उपभोगणे, दुर्व्यसन करणे, कुसंगात राहणे अशा दुष्कर्मात राहतात ते जिवात्मे कायमचे नरकगतीत घोर अंध:कारात पडतात व कल्पान्त काळापर्यंत अधोगतीत राहतात. या करिता सतपंथ तत्वाप्रमाणे नितिनियम धर्म पालनात राहून भगवंताच्या कृपाप्रसादाने उत्तमरितीने भवसागर तरून पार जाता येईल. कलियुगाचे प्रमाण चार लाख बत्तीस हजार वर्षाचे आहे व भगवान निष्कलंकी नारायणाचे अवतार कार्यही तेवढेच आहे. कलियुगाच्या अंतिम समयी भक्त कमलाकुवरच्या पुण्यप्रभावाने अनंत करोडी जीवात्म्यांचा उध्दार होईल तेव्हा भगवंताच्या सच्चिदानंद स्वरूप ज्योतीत जीवप्राणिमात्रांची ज्योति एकरुप होईन विलय पावेल.

ॐ हाच जीवात्म्याच्या त्रीविध तापांचा निवारण कर्ता आहे. तो सर्वांचा कल्याणकर्ता आहे. या कलियुगात रेखा मात्र राहिलेल्या धर्ममार्गाचे आचरण केल्यास जिवात्म्यास मोक्षगति लाभते. कलियुगात अथर्ववेद प्राधान्यभूत असून त्याचा वर्ण श्वेत आहे. निष्कलंकी नारायण हा प्रधानतत्त्व अवतार असून तोच हरि अंश अवतार आहे. कलियुगात मलिन तत्त्व धारण करणाऱ्या मेंच्छांचा संहार करून तो भरत खंडात जांबुद्विपात कुवारिका क्षेत्रात पदार्पण करेल व वसमकुवारी म्हणजे पृथ्वीशी लग्न करून एकरुप होईल. तो नारायण आपल्या अंगच्या चौसष्ट कलेने तळपेल. त्याच्यासमोर जीवात्म्याचा संपूर्ण पाप परिमल नाहिसा होऊन तो आपल्या सद्भक्तांना एकरुप करून टाकेल. ज्याने आपल्या जीवनात सत्याची कास धरली भगवान त्याच जीवात्म्यांचा उध्दारकर्ता होईल. बाकी तर कर्मगतीच्या फेऱ्यात मायावी पाशात अडकून अधोगतीस जातील. याकरितां त्या निष्कलंकी नारायणाची सेवा करून मुक्त व्हा. निष्कलंकी नारायणाच्या या गायत्री मंत्राचा जाप करून जीवनमुक्त व्हा.



य इमां देवो मेखलामाबबन्ध यः संननाह य उ नो युयोज।
यस्य देवस्य प्रशिषा चरामः स पारमिच्छात्स स उ नो वि मुञ्चात ॥१॥
आहुतास्यभिहुत ऋषीणामस्यायुधम् ।
पूर्वा व्रतस्य प्राश्नती वीरघ्नी भव मेखले ॥२॥
मृत्योरहं ब्रह्मचारी यदस्मि निर्याचन्भूतात्पुरुषं यमाय ।
तमहं ब्रह्मणा तपसा श्रमेणानयैनं मेखलया सिनामि ॥३॥
श्रध्दाया दुहिता तपसोऽधि जाता स्वस ऋषीणां भूतकृतां बभूव ।
सा नो मेखले मतिमा धेहि मेधामथो नो धेहि तप इन्द्रियं च ॥४॥
या त्वा पूर्वे भूतकृत ऋषयः परिबेधिरे ।
सा त्वं परि ष्वजस्व मां दीर्घायुत्वाय मेखले ॥५॥

अथर्व कां. ६ सुक्त १३३ मंत्र १ ते ५

१. ज्या आचार्य देवाने ही मेखला माझ्या शरीरावर बांधली जो आम्हास तयार ठेवतो आणि कार्यास लावतो, ज्या आचार्य देवांच्या आशिर्वादांनी आम्ही व्यवहार करतो तो आम्हास दुःखातून पार करण्याची इच्छा करो आणि तो आम्हास बंधनातून सोडवो.

२. हे मेखले तू सर्व प्रकारे प्रशंसित आहेस, तू ऋषीचे आयुध आहेस. तू कोण्या एखाद्या व्रताने पूर्वीच बांधली जातेस. तू शत्रु विरांना मारणारी हो.

३. ज्या कारणाने मी मृत्युला समर्पित झालेला ब्रह्मचारी आहे. त्या कारणाने मी मनुष्य प्राण्यातून एक पुरुष मृत्यूसाठी मागतो आणि त्या पुरुषाला मी ज्ञान, तप, परिश्रम करणाऱ्याच्या शक्तिसह या मेखलेने बांधतो.

४. ही मेखला श्रध्देची कन्या तपाने उत्पन्न झालेली प्राण्यांना उत्पन्न करणाऱ्या ऋषीचीं भगिनी झाली आहे. हे मेखले अशी तू आम्हास उत्तम बुध्दि आणि धारणाशक्ति दे आणि आम्हास तपशक्ति तसेच उत्तम इंद्रिये दे.

५. हे मेखले ज्या तुला पूर्व काळचा इतिहास निर्माण करणारे ऋषि बांधित आले. ती तू दीर्घायुष्यासाठी मला आलिंगन दे.

सुचना - नविन व्यक्तिस कांकण बांधायचे असेल तर त्यास हात जोडून, हातात रूपदर्शन म्हणजे ४ आणे, ८ आणे, १ रुपया बंधा अथवा चांदीची अंगठी घ्यावयास सांगून दुसऱ्या व्यक्तिने सुगंधी पांढरे फूल मोगरा, चाफा, जाईजुई, पांढरा गुलाब, पांढरी शेवंती, चमेली, रातराणी, निशिगंध, नेव्हाई इ. चे फूल तिर्थजलात भिजवून त्याच्या हातावर मनगटावर हळू हळू फिरवावे. त्यास काकण बांधणे म्हणतात.

(सतपंथ तत्वदर्शनात सांगितलेले आहे की सतपंथाच्या परंपरेनुसार आपल्या मुलांना अथवा मुलींना दिक्षा द्यावयाची असेल तर त्यांचे वय साधारणतः ५ ते ८ वर्षाचे असावे. विधीनुसार कलश घटपाटाची पूजा करून मुलांनी दिक्षा घ्यावी. योग्य समजदार, गुरु अथवा मुखीकडून दिक्षा घ्यावी. दीक्षा घेतांना आपल्यासमोर जी व्यक्ति आपणास फुलाने काकण बांधते ती व्यक्ति आपला गुरुबंधू आहे असे समजून जीवनभर त्यांच्याशी नाते निभवावे. गुरुबंधु भगिनींचे नाते अतूट व पवित्र असते. ते कांकण बांधण्याचे एक माध्यम असते. आपण ज्या गुरुकडून अथवा मुखीकडून गुरुमंत्र घेतो त्या मंत्राचे सतत अहर्निश स्मरण, चिंतन करावे. कारण तेच आपले तारक उध्दारक गुरु असतात. त्यांनी सुध्दा ज्या व्यक्तिला आपण दीक्षा दिलेली आहे त्यांचा उध्दार, कल्याण, श्रेय कशाने प्राप्त होईल याचे चिंतन करावे. जो तसा वागणारा मुखी नसेल त्याला गुरु करू नये हा शास्त्राचा दंडक आहे. अशा व्यक्तिकडून जर आपणास दैवयोगाने दीक्षा मिळाली असेल तर, आपण सद्गुरु ब्रह्मालाच आपला तारक गुरु मानून आपला उध्दार करून घ्यावा. कारण सतपंथ घटपाट पूजा विधीत आपले त्रिविध ताप निवारण

करण्याची शक्ति असते. शारीरिक सौख्य, मानसिक दैन्य आणि आत्मिक शांति प्राप्त करून देण्याचे सामर्थ्य या पूजेत असते शिवाय मेल्यानंतरही उटासनाच्या रूपाने पींडपाडून बावन घाटीतून, चारखाणीमधून सोडवून जीवात्म्याचे अपराध सोडवून त्यास मोक्षमार्गाचा अधिकारी बनविण्याचे सामर्थ्य या पूजेत असते म्हणून पूजा करणारा कोणीही जरी मुखी असला तरी त्याने केलेल्या शारीरिक, मानसिक व आत्मिक शुध्दतेच्या पावित्र्याने ती पूजा फलिभूत होत असते. म्हणून दीक्षा घेणे महत्वाचे असते. ज्याने दीक्षा घेतली नसेल त्याने कितीही पूजा केल्या तरी त्या व्यर्थ होतात.)

# मंत्र ३६ वा

## कांकण बांधवानो मंत्र. सतपंथनी दीक्षादान विधीनो मंत्र.

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरुं छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्वामी तमे आद्य निरंजन धुंधुकार, जीवपींडना सर्जनहार, श्री ब्रह्मा वाचा, श्री विष्णुवाचा, श्री महेश्वरवाचा, शिवशक्ति वाचा, श्री मत्स्यवाचा, श्री कूर्म वाचा, श्री वराहवाचा, श्री नृसिंहवाचा, श्री वामन वाचा, श्री परशुराम वाचा, श्रीराम वाचा, श्रीकृष्ण वाचा, श्री बुध्दवाचा, श्री निष्कलंकी नारायण वाचा, श्री सद्गुरुब्रह्मा वाचा, जांबुद्विपे, भरतखंडे कुवारिका क्षेत्रमाहे निष्कलंकी नारायणनो थयो दशमो अवतार, पात्र ब्रह्मा नरहरि अथर्ववेदनी कांडी भणी अे (नाम) ने कांकण बांधीये तो तेनी काया तेजस्वी थाय. ते अमरापुरमा जाय, ते फेराथी छुटे, अमर आसने बेसे. सद्गुरु इमामशाह तमारा पावळना प्रतापे अे (नाम) ने कमळाकुंवरनी सोबतमा राखो, तेत्रीस करोडीअनंतना मेळा आपो चन्द्रसूर्य पवन पाणी जमीन आकाश, अष्टकुळ पर्वत, नवकुळ नाग, बारकुळ मेघ, चारखाण, चारवाण, चारवेद तथा तेत्रीस करोडी देवताओनी पुरावो साक्ष, त्रिलोकनी दिधीवाचा. स्वामी तमारे नियमे कांकणे, तमारे कर्मे धर्मे अे (नाम) ने सतपंथना मार्ग माहे राखो. गुरुनरना दर्शन आपो. अे जीवोना अपराध क्षमा करो, अमरापुरमा वास आपो अे जीवनी चिंता हवे तमने छे. अे जीवने पावन करो.
सद्गुरु इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नमः॥

हाच मंत्र तीन वेळा म्हणून नंतर आचमन करायला लावून पवित्र करण्याचे मंत्र म्हणून त्या मनुष्यास उद्धूप देऊन नंतर पुढीलप्रमाणे आशिर्वादाचा मंत्र म्हणून त्यास दीक्षामंत्र सांगावा.

# मंत्र ३७ वा.

## आशिर्वादनो मंत्र

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरु छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्वामी तमे आद्य अंतना धणी श्री निष्कलंकी नारायण जांबुद्विपना धणी विष्णु नारायण विश्वना आधार, वेदना वसुमना आधार, सृष्टीना सर्जनहार, जांबुद्विपे गुरुनरे धर्या अवतार. सद्गुरु इमामशाह तमारा आ सेवक उपर स्नेहनी द्दष्टी करो. इमान भक्ति श्रध्दा कायम राखो. नीतिनियम धर्म अखंड राखो. क्रिया कर्ममा न चुकावशो, तमारा चरणना प्रतापे अे जीवने, सुखशांति आपो. त्रिविध ताप निवारो, सेवकना दु:ख दारिद्र्य दूर करो. जेणे सतपंथ देखाडया तेना अेकोत्तरसो पीढीया तारो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

गुरुमंत्र – ॐ नमो निष्कलंकी नारायण जनार्दनाय। ( षोडशअक्षरी मंत्र )

( गायत्री मंत्र ) – भस्मायुधाय विद्महे दिव्य नेत्राय धीमहि। तन्नोज्वरहर: प्रचोदयात्।

ॐ शांति: ! शांति: !! शांति: !!!

हे स्वामी तू सृष्टीच्या आदि अंताचा स्वामी आहेस. श्री ब्रह्मा, विष्णु, महेश, शिवशक्ति, मत्स्यादि दशावतारांच्या कृपाशिर्वादाने, श्री सदगुरु ब्रह्माच्या आशिर्वादाने भरतखंडातील जांबुद्विपातील कुवारिका क्षेत्राचा धणी श्री निष्कलंकी नारायण सद्गुरु ब्रह्माच्या कृपाप्रसादाने अथर्ववेदाच्या मंत्रविधीनुसार या किशोर-किशोरींना कांकण बांधत आहोत ते कांकण त्यांना अखंड संरक्षक राहो. त्यांची काया तेजस्वी राहून अमरपदाची प्राप्ति या बालकांना होवो. लक्ष चौर्यायशीच्या बंधनातून सुटून ते जीवात्म्ये अमरपद प्राप्त करोत. सद्गुरु ब्रह्माच्या चरणतीर्थाच्या कृपेने व प्रतापाने या बालक-प्रौढाना कमलाकुंवरच्या संगतीत राहू द्यावे. तेहेतीस करोडी देवता अनंत करोडी जीवात्म्यांचा मेळावा यांना लाभो. चंद्र, सूर्य, पवन, पाणी, पृथ्वी, आकाश, अष्टकुळ पर्वत, नवकुळ नाग, बारकुल मेघ चारखाणी, चारवाणी, चारवेद या सर्वांच्या कृपाशिर्वादाने व साक्षीने या जीवात्म्यांना सौख्य शांति, आनंद, समाधान लाभावे अशी हे बालक प्रार्थना करीत आहेत. गुरु अथवा मुखी शिष्याच्या मनगटावर जे कांकण बांधतात ते जणू काय त्यांना सत्कर्मासाठी तयार करतात. अशा गुरुंच्या आशिर्वादाने जे शिष्य व्यवहार करतात ते सर्व दु:खातून पार होतात आणि अंति मुक्ति प्राप्त करून घेतात. हे कांकण म्हणजे गुरुंचे शस्त्र आहे. प्रत्येक कार्य करण्यासाठी कंबर कसण्याचा बोध त्यातून मिळतो. याप्रकारे कटिबध्द होऊन कर्म करण्याने आळस, दु:ख, दैन्य दूर होतात. ज्ञान, तप, परिश्रम आणि कोणतेही

काम करवून घेण्याची युक्ती या गुणांनी ते तयार होतात. कांकण बांधणे हा विधी श्रध्देने करण्यात येतो. त्याने तप करण्याची प्रवृत्ति होते. श्रेष्ठ ऋषिमुनिपासून दीक्षादानाचा हा विधी चालत आलेला आहे. ही दीक्षा सर्वात उत्तम बुध्दि धारणाशक्ति, इन्द्रियनिग्रह आणि तप देवो. व ते गुरु पासून संरक्षक म्हणून मला मिळालेले कांकण दीर्घायुष्य देवो हीच ईश्वर प्रति प्रार्थना.



पृथिवी शान्तिरन्तरिक्ष शान्तिर्द्यौ: शान्तिराप: शान्तिरोषधय: शान्ति
र्वनस्पतय: शान्तिर्विश्वे मे देवा: शान्ति: सर्वे मे देवा: शान्ति:
शान्ति: शान्ति: शान्तिभि:। ताभि: शान्तिभि: सर्व शान्तिभि:
शमयामोऽहं यदिह घोरं यदिह क्रूरं यदिह पापं तच्छान्तं
तच्छिवं सर्वमेव शमस्तु न: ॥१४॥ अथर्व कां. १९/अनु. १/सु. ९/मं १४.

हे भूमि तू शान्तिदायक होवो. मध्यलोक ( वायुमंडल, मेघमंडल, तारांगण आदि ) आमच्याकरिता शान्तिदायक होवो. प्रकाशमान सूर्यादि द्यौलोक आमच्या करितां सुखदायक होवो. जल देवता वरूणराज शान्तिदायक होवो. औषधे अन्न, सोमलता आदि शान्तिदायक होवो. वनस्पति वट, पिंपळ, तुळस आदि शान्तिदायक होवो. सर्व विद्वानलोक संत, महंत, गुरु माझ्याकरिता शांतिदायक होवो. सर्व उत्तम पदार्थ माझ्याकरितां शांतिदायक होवो. माझ्या सर्व क्रिया सुखदायक व शान्तिकारक आणि धैर्यवंत होवो. त्या शान्तिमय आनंदादि क्रियांनी, सर्व शान्तिमय धैर्यादि क्रियांनी आम्ही शान्ति पावो. जे कांही येथे भयंकर घोर युक्त असेल, जे कांही क्रूर-निर्दय असेल, जे कांही येथे अनिष्ट पापमय असेल ते ते शान्तियुक्त होवो. ते कल्याणकारक होवो. सर्वही आमच्या करितां शान्तिदायक होवो.

## मंत्र ३८ वा.

## पुरुषने छाट नाखी लाई सुतक उतारवानो मंत्र.

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरू छुं. जे सदाय दयाळू छे. ॐ नमो श्री सदगुरु पात्र, ब्रह्माइन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

देव पावन, नूर पावन, निरंजन नारायण पावन. पंचदेव पावन, चौद ब्रह्मांड पावन. सप्तऋषि पावन, बार कुळ मेघ पावन. तमारा नाम पावन. तमारा ठाम पावन. तमारा नाम नूरना प्रतापे करीने अे (पुरुषनु नाम) भाई पावन. धरती

आकाश पावन, पवन पाणी पावन, चन्द्र सूर्य पावन, तारामंडळ ध्रुवमंडल पावन, अष्टकुळ पर्वत पावन, नवकुळ नाग पावन, तमारा नामनुरना प्रतापे (नाम) भाई पावन. नवनाथने चौर्यांशी सिध्द पावन, अठ्यायशी सहस्त्र ऋषीयो पावन. जगतना बधा संत महात्मा पावन. हरिअंश कुळ कायमना परिवार पावन, अडसट तीर्थ पावन. नव्वाणु करोडी यक्ष पावन, छप्पन करोडी मेघा पावन, बत्रीस करोडी किन्नर पावन, तेत्रीस करोडी देवता पावन, अनंत करोड देव पावन, तमारा नुरना प्रतापे (नाम) भाई पावन, नुरना छाटे सेवक पावन. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम:॥

दौष्वप्न्यं दौर्जीवित्यं रक्षो अभ्वमराय्य:।
दुर्णाम्नी: सर्वा दुर्वाचस्ता अस्मन्नाशयामसि ॥अथर्व ७/२३/१
परो ऽ पेहि मनस्पाप किमशस्तानि शंससि ।
परेहि न त्वा कामये वृक्षांवनानि सं चर गृहेषु गोषु मे मन:॥
अथर्ववेद ६/४५/१

१. वाईट स्वप्ने, कष्टमय जीवन, हिंसकाचा उपद्रव, विपत्ति, दारिद्रय, दुष्टभाषण शिव्या देणे इ. जे जे वाईट गुण आमच्यात आहेत त्यांना आम्ही दूर करतो.

१/३. हे मनाच्या पापा तू दूर जा. तू वाईट गोष्टी कां करतोस. तूला मी इच्छित नाही. वृक्ष आणि वनामध्ये संचार कर. माझे मन माझ्या घरात आणि गावात आहे. हे ज्ञानीप्रभो! जे काही पाप असत्याचरणाने आम्ही करतो त्या सर्वापासून अंगिरस प्रचेत्याप्रमाणे व्यापक ज्ञानी देव आम्हास दुराचाराच्या पापापासून वांचवो.

# मंत्र ३९ वा.

## स्त्री ने छाट नाखी लाई-सुतक उतारवानो मंत्र.

(स्त्री प्रसूत झाल्यानंतर उभय पतिपत्निंनी सव्वा महिन्यापर्यंत म्ह. ४० दिवस पर्यंत देवपूजा, देवतार्चन अथवा स्वयंपाक आदि घरातील काम धंदा करु नये. प्रसूतिच्या वेदना शमन होण्याकरिता स्त्रीस विश्रांतीची गरज असते. ४० दिवसानंतर मंदिरात दोघा पतिपत्निंनी जाऊन घटपाट पूजा भरवून पूजाअर्चा करून शुध्द व पवित्र होणे अत्यंत आवश्यक आहे. त्यास लाई-सुतक म्हणजे विरधी म्हणतात. बाकीच्या गोत्रजांनी ११ दिवसपर्यंत विरधी-वृध्दि पाळावी असा सतपंथाचा नियम आहे. त्यास नियम उजवणे असे सुध्दा म्हणतात.)

**ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरू छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्गुरु पात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-**

**प्रथम आद्य निरंजन धुंधु:कार तमे सरजी मुरत चार. तमे सृष्टिना सृजनहार. तमे किधा वेद विस्तार स्वामी तमे धर्या अवतार. अथर्ववेदमा सचराचर. खाणी वाणी ने सर्जा भेद, तमे सर्ज्या अमरभेद, अमरभेदथी अमर काया, आद्य अंते नूर निपाया, नूरथी निर्मल जीव निपाया. स्वामी तमथी उपन्या तम माहे समाया. सुतक टाळो, पातक बाळो, नूरे जीवनापींड पखाळो सद्गुरु स्वामी छाटनाखी छोत उतारो, पापनी मोट उतारो. सुतक पातक प्रायश्चित्त उतारो. दिन अेक मास, छ मास, दसमास, दिनचार जारज खाणीमा मनुष्य अवतार. तमे उतारो अे (स्त्रीनु नाम) ना भार परअन्न, परजळ दुनिया तणो वहेवार. तमे नुरथी पावन करो, सुतक टाळो, पातक बाळो, साचो, झुठो, भुल्यो, चुक्यो वाचा वचने वेदहिने, उणी आचारी, अवगुणी पातके भर्यो, पाचे पातक दूर करो वारोवारलगी पावन करो, नुरे करी जपावो अजपा जाप, तमे उतारे अे सेवकना पाप, गतगंगाने सकळ संघ. अनेक वर्णने अेकज अंग नूरथी पातक दूर करो. इमामशाह तमे जीवानो तारणहार, स्वामी तमे अे (नाम) ने पावन करो. बारे राशी जीवोना अपराध क्षमा करो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥**

प्रथम आद्यनिरंजन निराकार धुंधु:कारामधून या सृष्टीचे सर्जन झाले हे भगवंता! तुम्ही या सृष्टीतील चराचरांच्या ठायी वसलेल्या वेदांचा विस्तार केला. त्याकरितां तुम्ही वेगवेगळे अवतार धारण केले. अथर्ववेदाच्या विस्तारामधून तुम्ही निरनिराळ्या खाणीतून वाणीतून वेद विस्तारीत केला व आम्हा प्राणिमात्रांना अमर गतीचा मार्ग दाखविला. हे शरीर जरी मरणधर्मा असले तरी त्यात वसलेला आत्मा मात्र अमर आहे, भगवंताच्या तेजामधूनच या आत्म्याची निर्मिति झालेली आहे. या जीवाची निर्मिती सुध्दा त्याच आत्म्यामधून झालेली आहे. पण जीवअविद्याग्रस्त मायेने झाकलेला आहे तर आत्मा हा शुध्द निर्लेप आहे. हे भगवंता! मातेच्या उदरात - गर्भवासात जन्माला येणाच्या अगोदर हा जीव निरनिराळ्या मायेच्या बंधनात अडकलेला असतो. मातेच्या गर्भातून या जीवात्म्याची बाहेर येण्याकरिता सारखी तगमग लागलेली असते. जीवात्म्याचा जन्म झाल्यानंतर त्याच्या माता-पित्याला जे प्रायश्चित्त घ्यावे लागते सत्पंथ मंत्र साहित्यात त्यास लाई-सुतक उतारण्याचा अथवा नियम उजविण्याचा मंत्र असे म्हणतात. त्या वेळेस म्ह. ४० दिवसानंतर त्यांनी कलश पूजा भरवून त्यात नूराचा म्हणजे गुरुचरणामृत तिर्थाचा छाट घेऊन शुध्द व पवित्र व्हावयाचे असते. त्या वेळेस जी प्रार्थना करायची ती अशी, ईश्वर सर्वांस पवित्र करणार आहे तो मला पवित्र करो. ज्या आशेच्या मागे लागून आम्ही वारंवार प्रतिज्ञा करतो आणि पापास न जाणता सुध्दां वारंवार याचना करीत राहिलो आहे.

ती सर्व पापे दूर होवोत. ज्ञानी, ज्ञानदाता, प्रकाशमय देव आमच्या शत्रुंना दूर करो. वाईट स्वप्ने, कष्टमय जीवन, हिंसकांचा उपद्रव, विपत्ति, दारिद्रय, दुष्ट भाषण, शिव्या देणे, अश्लील बोलणे, अपशब्द वापरणे इ. जे जे वाईट गुण आमच्यात आहेत त्यांना आम्ही दूर करतो. अशा प्रकारची प्रार्थना करावी. सद्गुरु महाराजांच्या चरणतीर्थाच्या प्रभावाने जीवात्म्याच्या ठायी वसलेला अविद्यारुपी अंध:कार नाहिसा होऊन जीवात्म्यास सत् ज्ञानाची प्राप्ति होते.



क्षेत्रियात् त्वा निर्ऋत्या जामिशंसाद् द्रुहो मुञ्चामि वरुणस्य पाशात्।
अनागसं ब्रह्मणा त्वा कृणामि शिवे ते द्यावापृथिवी उभे स्ताम् ॥१॥
सूर्यमृतं तमसो ग्राह्या अधि देवा मुञ्चन्तो असृजन्निरेणसः।
एवाहं त्वां क्षेत्रियान्निर्ऋत्या जामिशंसाद् द्रुहो मुञ्चामि वरुणस्य पाशात्।
अनागसं ब्रह्मणा त्वा कृणोमि शिवे ते द्यावापृथिवी उभे स्ताम् ॥८॥

अथर्व वेद २ सुक्त १० मंत्र १ ते ८

१. मनुष्याने वेद ज्ञान प्राप्तिच्या योगे अशा प्रकारचा प्रयत्न करावा की आत्मिक, शारीरिक आणि दैवी विपत्तितून आणि मूर्खांच्या दुष्ट आचरणापासून दूर राहावे. ज्यायोगे परमेश्वर किंवा राजा ज्याला दण्ड देऊ शकेल अशा पापापासून जो पराङ्मुख राहिल म्ह. पापविरहीत राहिल, जो सुशिलअसेल त्याच्याकरितां जगातील सर्व पदार्थ आनंदकारी होवो.
२. मनुष्याने विज्ञानपूर्वक देश, काल, अग्नि, जल, वायु, खान, पान इ. पदार्थांचे उपयोग व गुणधर्म तपासून स्वस्थ व ऐश्वर्यवान होऊन आनंद उपभोगावा.
३. मनुष्याने प्रयत्न करून व परिश्रम करून शरीरात वसलेला प्राणवायु व देशस्थवायु आणि सर्वस्थानास यथोचित स्वस्थ शुध्द पवित्र ठेवून आनंद प्राप्त करा.
४. जसा सूर्य आपल्या किरणांनी आकर्षण करून पृथ्वी आदि लोकांना धारण करतो, वायुमंडल त्यांचे पतन होऊ नये म्हणून त्यांचे संरक्षण करतो, अशाच रीतीने मनुष्याने सुध्दा आपले अध:पतन होऊ नये म्हणून त्यांचे पोषण करून सुखी ठेवायला हवे आहे.
५. मनुष्याला भगवंतांनी सर्व प्राणिमात्रात श्रेष्ठ बनविले आहे. म्हणून त्याने पुरुषार्थ करून सर्व विघ्न दूर हटविले पाहिजे व किर्तीमान होऊन आनन्द उपभोगून अमर व्हायला हवे.
६. ज्याप्रमाणे उत्तम वैद्य रोग्यांच्या रोगाचे निधान करून रोग्यास स्वस्थ बनवितो तसेच ब्रह्मचारीने सुध्दा वेदविज्ञानाच्या प्राप्तिने निर्मल होऊन सुखी बनायला हवे आहे.

७. मनुष्याने वैर सोडून उदार उपकारी सर्वमित्र बनून अनेक बल व मुक्तीचा आनंद प्राप्त करून घ्यावा.

८. ज्याप्रमाणे परमेश्वराच्या शक्तिने सूर्य प्रलय वा ग्रहणाच्या अंध:कारातून सुटून प्राणिमात्रांचे क्लेश दूर करतो, त्याप्रमाणे मनुष्यानेही सर्व प्रकारच्या विघ्नांचा नाश करून आत्मिक बल वाढवून संसाराचा उपभोग घ्यावा व आनंद भोगावा.

## मंत्र ४० वा.

## जीवना अपराध छोडाववानो मंत्र.
## (सामाजिक गुन्हा उतारवानो मंत्र.)

(सामाजिक गुन्हा याचा अर्थ, एखाद्या व्यक्तिकडून अजाणता गाय, बैल, म्हैस, शेळी, कोंबडी, कुत्रा, मांजर, माकड वगैरे प्राणि मारले गेले असतील व तसे पाप आपल्याकडून परत घडू नये असा पश्चात्ताप होत असेल तेव्हा या मंत्राचा उपयोग करतात. दुसरे असे कीं आपल्याकडून दुसऱ्याची निंदा, द्वेष, मत्सर, परस्त्रीगमन खोटी साक्ष, खोटे दस्तऐवज वा हिंसा झाली असेल तर त्या पापापासून मुक्तता होण्याकरीतां ह्या मंत्राचा विनियोग करतात. याशिवाय ज्या स्त्रीचा गंधर्वविवाह झालेला असतो ती स्त्री प्रथम गोत्राचा त्याग करते व नविन गोत्रात प्रवेश करते तो एकप्रकारचा सामाजिक गुन्हाच गणला जातो म्हणून ती स्त्री ज्या गोत्रात प्रवेश करते त्यावेळी त्या स्त्रिला कांकण बांधून म्ह. सतपंथाची दीक्षा देऊन गुन्हा उतारला जातो त्यावेळी या मंत्राचा उपयोग करतात.)

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरू छुं, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्‌गुरु पात्र ब्रह्मा, इन्द्र इमामशाह आद्य विष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्वामीजी तमारे पारे आव्या, तमे ईंडमध्ये आलंछन किधा, त्यारे ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, शक्ति उपन्या. त्याथी सृष्टि जो थई, त्यारे ब्रह्माजीनी सृष्टीना त्रण टोळा थया. ते टोळामाहे ब्रह्माजी पुछवाने गया. त्यारे प्रणाम नारायणना थया. वायक बे टोळे न मान्या त्या अेके टोळे मान्या ते जीव अमर थया.

प्रथम दशरायण कल्पमाहे नव्वाणु करोड जीव यक्ष साथे अमर थया. जेमणे ब्रह्मा विष्णुना परिवार पूजा, पाय पूजा अने ऋग्वेदने वायके चाल्या आ सतपंथना आधारे ते जीव अमर थया.

द्वितीय देवगुण कल्पमा छप्पन करोड जीव मेघा साथे अमर थया जेमणे ब्रह्मा विष्णुना परिवार पूजा, पाय पूजा ने यजुरवेदने वायके चाल्या आ सतपंथना आधारे ते जीव अमर थया.

तृतीय पंखला कल्पमा बत्रीस करोड जीव किन्नर साथे अमर थया, जेमणे ब्रह्मा विष्णुना परिवार पूजा पाय पूजा ने सामवेदने वायके चाल्या आ सतपंथना आधारे ते जीव अमर थया.

चतुर्थ करण कल्पना युग किधा चार तेमा विष्णुनारायणे धर्या दश अवतार. पहेला क्रता युगमा पाच करोडी जीव राजा प्रल्हाद साथे अमर थया. जेमणे ब्रह्मा विष्णुना परिवार पूजा ने पाय पूजा अने ऋग्वेदने वायके चाल्या आ सतपंथना आधारे ते जीव अमर थया.

बीजा त्रेतायुगमा सात करोडी जीव राजा हरिश्चन्द्र साथे अमर थया जेणे ब्रह्मा विष्णुना परिवार पूजा पाय पूजा अने यजुर्वेदने वायके चाल्या आ सतपंथना आधारे ते जीव अमर थया.

त्रीजा द्वापार युगमा नव करोडी जीव राजा युधिष्ठिर पाचे पांडव साथे अमर थया जेमणे ब्रह्मा विष्णुना परिवार पूजा पायपूजा अने सामवेदने वायके चाल्या आ सतपंथना आधारे ते जीव अमर थया.

चोथा कलियुगमां बारा करोडी जीव सद्गुरु ब्रह्मा साथे अमर थया जेमणे ब्रह्मा विष्णुना परिवार पूजा पाय पूजा अने अथर्ववेदने वायके चाल्या आ सतपंथना आधारे ते जीव अमर थया.

कलियुगना अंते अनंत करोडी जीवने भक्त कमळाकुंवरनी संगतमा राखो. स्वामी अमारा अपराध क्षमा करो आ (पुरुष अथवा स्त्रीनुं नाम) सेवक अपराधी घडी घडीनां, पळ पळना, तल तलना स्वामी जे हिसाब फळंतर वेळाये पुछो ते जीवना हिसाब घटपाट आगळ चुकावो. ते गुरुगतगंगामा हिसाब चुकावो. अे पतीत जीव तमारो छे, अे जीवने पावन करो. तमे पावन करवा योग्य छो. आज अथर्ववेदने वायके आ सतपंथना आधारे अे (नाम) जीवने पावन करो. सहस्त्र सहस्त्र हरिअंश कुळ कायमना प्रतापे करीने अे जीवना अपराध क्षमा करो. जंबुद्विपे कुवारीका क्षेत्रने स्थळे करी अे जीवना अपराध क्षमा करो. चौदलोकमा जे देवताओ होय तेमणे प्रतापे करीने अे जीवना अपराध क्षमा करो. स्वामी तमे साचा तमारा सतपंथमा जे देवता होय ते पण साचा, जेणे आज कलियुगमा बारा करोडी जीवात्माने सतपंथ देखाड्या ते सद्गुरु साचा. तमारा सत्ते तमारा दत्ते करीने अे (नाम) जीवना अपराध क्षमा करे. जे कोई अपराधीजीव तमारे सिंहासने आवे ते जीवना अपराध क्षमा करो.

**युगे युगे गुरु घटना धणी छो. चार खाणीना फेरा टाळो. लक्ष चौर्यायशीना दु:ख निवारो. जांबुद्विपमा आशपुरो, अमरापुरमा वासो देवो. भुल्या जीव गुप्ती प्रगटी उणीआचारी सर्व जीवोने तमारी कळामा राखो. तेत्रीस करोडीना मेळा आपो. अनंत करोडीनी संगतमा राखो मेरु समान दान, विश्वंभरा भोजन स्विकारो. पृथ्वी प्रदक्षिणानु फळ आपो. आ सतपंथना आधारे अथर्ववेदने वायके जे नर जांबुद्विपमा होय तेमणे प्रतापे करीने, निष्कलंकी नारायणना प्रतापे करीने अे (नाम) जीवना अपराध क्षमा करो. आ सेवक युगे युगना अपराधी छे, कर गर्या, काने धरो, समर्या सहाय करो, किधा अपराध क्षमा करो, बिजा अपराध ना करावशो. तमारी कळामा राखो, तमारी दृष्टीमाहे राखो. तमारी छत्रतळे राखो, सतीयाओनी संगतमा राखो. यति सति संतोषीना मेळामा राखो अमे. अपराधी स्वामी तमो अपराध क्षमा करनार छो. सद्‌गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥**

(सुचना - ज्याचा गुन्हा उतरावयाचा असेल त्यांनी स्वतंत्र कलशपाटाची पूजा करावी. या मंत्राच्या वेळेस त्याच्या डोक्यावर पाण्याने भरलेला छोटासा कलश ठेवावा त्यात रुपदर्शन म्हणून रुपेरी अंगठी किंवा चांदीचा शिक्का टाकावा व हा मंत्र तिनदा म्हणून नंतर त्या व्यक्तीस आचमन करायला लावून उदधूप देऊन अपवित्रने पवित्र करण्याचा मंत्र म्हणावा. गतगंगेकडून त्याच्या अपराधाबद्दल माफी मागावयास सांगावे, 'गुरुनरना प्रतापे अपराध क्षमा करो' असे गतगंगेने म्हणून संमति द्यावी.)

तीन कल्प दशरायण, देवगुण व करण कल्पात अनुक्रमे प्राधान्यभूत असलेल्या ऋग्वेद, यजुरवेद व सामवेद यांच्या आधाराने युगधर्माप्रमाणे ज्यांनी भगवंताची आराधना केली, प्रचलितसमयी प्रगट असलेल्या सद्‌गुरुब्रह्माच्या चरणतीर्थाच्या प्रतापाने व सत्पंथ कलश सिंहासनाचे आधाराने त्या त्या कल्पात तसेच त्या त्या युगात जे जीवात्मे नित्य नियमाने वागले असे जीवात्मे यक्ष, मेघ, किन्नर, पाच करोडी प्रल्हादाबरोबर, सात करोडी हरिश्चन्द्रा बरोबर, नव करोडी युधिष्ठिराबरोबर व बारा करोडी सद्‌गुरु ब्रह्मा बरोबर उध्दरले गेले आता कलियुगाच्या अंति भक्त कमळाकुवर बरोबर अनंत करोडी जीवात्म्यांचा उध्दार होईल. भगवंता त्यासमयी आम्हाला तू विसरू नको. आम्ही बालक घडीघडीने व तिळतिळाने विसरणारे आहोत अज्ञानी अपराधी आहोत तू आम्हाला पदरात घे व आम्हाला तुझ्या अनंत करोडीच्या संघात सामवून घे. निष्कलंकी नारायणाच्या नामस्मरणाने त्याच्या व भक्त कमळाकुंवरच्या पुण्यप्रभावाने आम्हाला पावन कर. ज्याप्रमाणे हरिअंशी अवतारात जन्म घेऊन तू अनंत लिला अनंत क्रिडा करीत असतो व युगधर्मानुसार हे जीवात्मे तूझी उपासना करतात तसे अनंत ऋषिमुनिंच्या कुळगोत्रात जन्मलेले हे जिवात्मे ऋषिमुनिंच्या पुण्यप्रभावाने तुझी उपासना करतात तू या जिवात्म्यांना पावन कर व मोक्षपद तू त्यांना दे. आम्ही अपराधी बालक संसारात येऊन जाणता अजाणता

जाणून बुजून अपराध करतो पण पश्चात्ताप झाल्यानंतर तुलाच शरण येतो आम्हाला तू पावन कर. तुझ्या छायेत आम्हाला सामावून घे. दुसऱ्यांदा मी तसा अपराध करणार नाही अशाच प्रकारची बुध्दि तू मला दे व तुझ्या संघमेळाव्यात घे. विश्वंभर भोजन किंवा पृथ्वी प्रदक्षिणेचे फळ जरी या जिवात्म्यास लाभले नाही तरी पण तुझ्या गतगंगेच्या पुण्यप्रभावाने या जिवात्म्यास पावन कर. अशा प्रकारची आराधना जीवात्म्याने करावी व पावन व्हावे.



ॐ एतं भागं परि ददामिं विद्वान्विश्व कर्मन्प्रथमजा ऋतस्य।
अस्माभिर्दत्तं जरसः परस्तादच्छिन्नं तन्तुमनु सं तरेम ॥१॥
ततं तन्तुमन्वेके तरन्ति येषां दत्तं पित्र्यमायनेन।
अबन्ध्वेके ददतः प्रयच्छन्तो दातुं चेच्छिक्षात्स स्वर्ग एव ॥२॥

अथर्ववेद कां. ६ सूक्त १२२ मं. १ ते ५

१. हे जगताची रचना करणाऱ्या प्रभो! तूच सत्यधर्माचा प्रवर्तक आहेस, म्हणून मी माझा भाग संपूर्णपणे तुला अर्पण करतो. या समर्पणाने जो अविच्छिन्न यज्ञ होईल. त्याच्या सहाय्याने आम्ही दुःखे पार करू.

२. या यज्ञाचा आश्रय करूनच कित्येक लोक पार झाले. ज्यांचे काही पैतृक ऋण बाकी असेल, ते बंधनामुळे कठीण प्रसंग प्राप्त झाले तरी ऋण परत करतात. असे लोक जेथे राहतात ते स्वर्गधामच होय.

३. हे स्त्री-पुरुष हो! तुम्ही दोघे गृहस्थाश्रम स्विकारल्यानंतर शुभ कार्य करीत राहा आणि उन्नतिसाठी प्रयत्न करा. या गृहस्थाश्रमात श्रध्दावान लोकच सुखाने राहू शकतात. जे त्यांत पूर्ण अनुभवी अथवा परिपूर्ण झाले आहेत त्यांच्या रक्षणासाठी तुम्ही दोघे प्रयत्न करा.

४. जो यज्ञ तपाने होतो त्यासाठी मनःपूर्वक प्रयत्न करून तो पूर्ण करणे हेच योग्य आहे. या प्रमाणे वृध्दापकालापर्यंत शुभ कर्म करीत राहिल्याने उच्च स्वर्गधाम प्राप्त होते.

५. या कन्या पवित्र आणि शुध्द आहेत. त्यांना वेगवेगळ्या ज्ञान्यांना निरनिराळ्या अर्पण करतो. ज्या इच्छेने मी हा यज्ञ करीत आहे ती माझी इच्छा सफल होवो.

# मंत्र ४१ वा.

## हळद – कुंकुमना छाटनो मंत्र.
## ( वर – कन्याने आशिर्वादनो मंत्र. )

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरूं छुं. जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सद्‌गुरुपात्र ब्रह्मा इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :–

श्री गुरूवाचा, नर वाचा. श्री रूद्रशक्ति वाचा. श्री ब्रह्मा विष्णु महेश्वर वाचा. श्री लक्ष्मी, पार्वती, सावित्री, गायत्री, सरस्वती वाचा. प्रणाम नारायणने सतदत्तचित्त वाचा, वेदवाचा आद्यवंश सतपंथनी वाचा. वेदवंश परिवारनी वाचा. नवखंड सप्तद्विप पृथ्वीनी वाचा. चोवीस मुलकनी वाचा. अष्टकुळ पर्वत, नवकुळ नाग, बारकुळ मेघनी वाचा. सप्तऋषीओनी वाचा. नवसो नव्वाणु नदीओनी वाचा चारखाण चारवाणनीवाचा. षड्‌शास्त्रनी वाचा. अढारभार वनस्पतीनी वाचा. चन्द्रसूर्य नवग्रह नवलाख तारानी वाचा. चौद भुवनना देवलोकनी वाचा. अग्नी तेज वायु अन्नदेव वरूण देवनी वाचा. धुंधु:कारनी ईंड छेद्यानी वाचा. करण कल्पनी चार युगोनी वाचा. सतदत्त दया क्षमा यति सती संतोषी रहेणीनी वाचा, अडसठ तीर्थनी वाचा. नवनाथ चौर्याशी सिध्दनी वाचा, अठ्यायशी सहस्त्र ऋषिओनी वाचा. जगतना बधा संत महंत भक्तोनी वाचा. नव्वाणु करोडीसु यक्षनी वाचा, छपन्न करोडीसु मेघानी वाचा. बत्रीस करोडीसु किन्नरनी वाचा, पाच करोडीसु प्रल्हादनी वाचा, सात करोडीसु हरिश्चन्द्रनी वाचा, नव करोडीसु युधिष्टिर पाचे पांडवोनी वाचा. बार करोडीसु कमळाकुवरनी वाचा. अनंत करोडी देवनी वाचा. श्री निष्कलंकी नारायणनी वाचा. दसे अवतारोनी वाचा, कुलऋषीवरनी वाचा, गतगंगा मुखी मुसाफरनी वाचा. सप्तदूत चौसष्ट लाख देवीओनी वाचा, हरिअंश कुळ कायमना परिवारनी वाचाये आद्यउनादे ॐ कारे धर्म स्थाप्यो तथा सद्‌गुरु ये विस्तार किधा. आद्यसतपंथनी स्थापना करी, वेद वंशे तो आव्या हरी, स्थापना करी देखाडया धर्म, ऋषिवर जीवोना उतारवा कर्म. पेहेला सर्ज्या वेदने वाण पछी सर्जी चारे खाण, प्रणाम तमारा प्रार्थना विनंती सुणो अमारी, स्वामी तमे निरंजन निराकार निष्कलंकी नारायण सृष्टीना धणी शांति करो, आवती बला टाळो, कमाइमा बरकत करो, रोजी अक्षय करो, सेवक उपर दया करो, बालगोपलपर कृपा दृष्टी करो, अनिष्ट परहरो ने इष्ट करो, आइपे दूर करो द्वैत शत्रुता दूर करो, सेवकनी खेतीवाडी वणज वेपारमा लाभ आपो. आव्या विघ्न दूर करो, अपराध क्षमा करो, चोपाई दोपाईपर दया करो. सेवकना हरेक

**विघ्न दूर करो वाडी तमारी हरी भरी राखो. स्वामी तमे लज्जा अब्रु राखो, सेवकोनी विपत्ति दूर करो. अे (वर अथवा कन्यानो नाम) सेवकना त्रिविध ताप निवारो, तेणे सुखशांति आपो, लक्ष चौर्याशीना फेरा टाळो, समर्या सहाय करो, करगर्याकाने धरो, आवागमन दूर करो, किधा अपराध क्षमा करो, बीजा अपराध ना करावशो, पाच सात नव बार तेत्रीस करोडीना मेळा आपो. तमारा सिंहासन घटपाट आगळ अे जीव विनंति करे छे ते विनंति तमे आशिष आपी स्विकार करो. सेवकनी आशा आकांक्षा इच्छा कामना पुरावो, पूजापात्री स्विकार करो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम:॥**

संपूर्ण विश्वव्यापी देव देवतांच्या आशिर्वादाने ज्या वर-वधुंचा वाङ्गनिश्चय झालेला असतो. त्या वराला अथवा वधुला कलश पूजेच्या माध्यमातून सर्व देव देवतांच्या साक्षीने हळदीचा कार्यक्रम होतो. त्यास ''देव ब्राह्मण'' विधी म्हणतात. हाती घेतलेले विवाहाचे कार्य निर्विघ्नपणे पार पडावे म्हणून सर्व प्रथम भगवंताची आराधना करण्याचा हा विधी असतो. मंत्रोपचाराने मंतरलेली हळद व कुंकु वराला व वधुला दुसऱ्या दिवशी लावीली जाते. विवाहकार्याकरितां जो वाङ्गनिश्चय केला जातो. तो वर कसा असावा याबद्दल थोडक्यात माहिती अशी की वर यम नियमांचे पालन करणारा धर्म नियमास अनुकुल असे स्वत:चे आचरण ठेवणारा, स्वत:च्या धर्मपत्निचे रंजन करणारा हवा आहे. गृहस्थधर्मात धर्मपत्नि पुरुषाची प्रकृति आहे त्या धर्मपत्नीचा संतोष वाढविणारा, बंधनरहित अर्थात ज्याचे मन स्वतंत्रता इच्छिते, गुलामीची भावना ज्याच्यामनात असत नाही. स्वत:च्या परिस्थितीस उत्तम जाणणारा आणि स्वत:चे कर्तव्य नीट रीतीने समजणारा, प्राणायामादि योगसाधनांनी ज्याचे स्वत:चे बळ वाढले आहे, ज्ञानाने युक्त हे वराचे गुणधर्म आहेत.

कन्या अशी असावी की तिला पाहताच मनात प्रेम उत्पन्न व्हावे. रुप, तेज, अवयवांची सुंदरता, स्वच्छता, ज्ञान या सर्व गोष्टी अशा असाव्या की, ज्याच्यामुळे पाहणाराच्या मनात तत्काल प्रेम उत्पन्न व्हावे, जी पतिघरी जाऊन रहाण्याचे पसंत करते, जी पतिगृहासच स्वत:चे खरे घर समजते, कुलाचे पालन करणारी, पित्याच्या आणि पतिच्या कुलमर्यादांचे पालन करणारी, जी स्वत:च्या सदाचाराने दोन्ही कुळांचे यश वाढविते. जी पतीचे भाग्य वृध्दिंगत करील. जिच्यामुळे आपण धन्य झालो असे पतीस वाटावे. विवाहापूर्वी अथवा आपत्काळी माता-पित्याच्या अथवा भावाच्या घरी राहणारी, विवाहानंतर पतिगृही राहणारी, इतर कोणाकडे जाऊन राहण्याची इच्छा करणारी कन्या नसावी. वृक्षावरील फुलांच्या माळेप्रमाणे कन्या असावी. पित्याच्या कुलवृक्षास कन्यारुपी पुष्पमाळा सुगंधीत करते.

अशा गुणधर्मींनी युक्त असे जे वर-वधु असतात ते भगवंताची आराधना करतात की हे भगवंता! आमच्याकडून कोणतेही धर्ममर्यादांचे उल्लंघन होऊ नये. आम्हाला तुझ्या छत्रतलात

घे. आमच्यावर कृपादृष्टी कर आम्हाला पावन कर. आम्ही तुला शरण आलो आहे. आम्हाला तुझा कृपाशिर्वाद दे. तुझ्या आशिर्वादाने व सर्वदेवदेवतांच्या साक्षीने आम्ही गृहस्थाश्रमात प्रवेश करीत आहोत आम्हाला सद्बुध्दि सत्प्रेरणा देऊन आमचा गृहस्थाश्रम सुखी समृध्द, निरामय, निर्मल होवो असा आशिर्वाद आम्ही सद्गुरु चरणी मागतो.



ह्वयामि ते मनसा मन इहेमान् गृहाँ उप जुजुषाण एहि।
स गच्छस्व पितृभिः स यमेन स्योनास्त्वा वाता उपवान्तु शग्माः ॥२१॥
उदह्व मायुरायुष क्रत्वे दक्षाय जीवसे।
स्वान गच्छतु ते मनो अधा पितॄँरुप द्रव ॥२३॥
यत् ते अङ्गमतिहितं पराचैरपानः प्राणो य उवा ते परेतः।
तत् ते संगत्य पितरः सनीडा घासाद् घासं पुनरावेशयन्तु ॥२६॥
सं विशन्त्विह पितरः स्वा नः स्यान कृण्वन्तः प्रतिरन्त आयुः।
तेभ्यः शकेम हविषा नक्षमाणा ज्योग् जीवन्तः शरदः पुरुचीः ॥२९॥

अथर्ववेद १८ / अनु. २ / सुक्त २ मंत्र २१, २३, २६, २९

२१. हे विद्वान पितर! तुझ्या मनाला मनाने मी येथे बोलवीत आहे. या घरांत आदर पूर्वक तुझे स्वागत असो. या घराला तू प्रसन्न कर. रक्षक महात्मा म्हणजे पितर आणि यम म्ह. न्यायकारी परमात्म्याशी तू यथेच्छेने मिळ. सुखदायक आणि शक्तिदायक सेवनीय पदार्थ तुला यथावत प्राप्त होवो.

२३. हे विद्वान ते जीवनाला जीवनाकरितां बुध्दि कर्माकरितां व बलाकरिता आणि प्राण धारण करण्यांकरितां उत्तम रीतीने मी तुला बोलाविलेले आहे. तुझे मन आपल्या लोकात स्थिर राहावे या घरातील तुझ्या लोकांना शुभ आशिर्वाद प्राप्त व्हावा.

२६. हे मनुष्या जे तुझे शारीरिक वा आत्मिक अंग उलट होऊन हटलेले आहे आणि तुझा जो अपान प्रश्वास व प्राण म्ह. श्वास विचलित झालेला आहे. समान घरातले पितर लोक (रक्षक महात्मा) मिळून तुझी झालेली हानी भरून देइल ज्याप्रमाणे गवताची पेंडी गवतानेच बांधली जाते.

२९. आमच्याकरीता सुख देणारे व जीवन देणारे पितरलोक या घरात येऊन प्रवेश करो. भक्तीच्या योगाने चालणारे व दीर्घकालापर्यंत जगणारे हे पितृलोक आम्हाला सुखदायक व शांतीदायक होवो.

# मंत्र ४२ वा.

## पुण्यतिथी तथा श्राध्दनो मंत्र. (देवथाळनो मंत्र)

ॐ परमकृपाळू परमात्मानी आज्ञाथी आदरु छु, जे सदाये दयाळू छे. ॐ नमो श्री सदगुरुपात्र ब्रह्म इन्द्र इमामशाह आद्यविष्णु निरंजन निष्कलंकी नारायण तमारी आशिषे :-

स्वामी तमे सृजनहार, ब्रह्मा विष्णु कुल अवतार. नुर सद्गुरु कायमरुप, आद्य निरंजन अेक अने जुजवा रुप तमारु नुर तमारु सुर सृष्टीमा छे भरपूर. कुळ घटना अपराध करो दूर. तमारा नाम तमारा ठाम, तमारी आज्ञाये थाळ मेहेमानी स्विकार करो. पान, फूल, फल, शाक, पाक, प्रसाद, अन्नपाणी, वस्त्र, वासण, दमडो, दोकडो, कोडी, बदाम, स्विकार करो. मुखी मुसाफर घटसकळ संघनी आशिष तमे स्विकार करो. तमे दाता तमे भोक्ता विश्वने वरो, कळाने वरो, तमारा नाम नुरनी दया करो, गतगंगा सकळसंघ उपर स्नेहनी दृष्टी करो. तमारा आसन अविंचळ करो. वारानु आयुध धरो. अे जीवने खुशाल करो. वेद वर्तमाननु फळ आपो. सिंहासन तमारु तमे स्थापो. ऋषिवर सेवकोना पाप कापो. खेती कमाइमा लाभ आपो मुखी मुसाफरनी प्रार्थनाये सकळ संघमाथी वेरझेर काढो. जीव जमाने जगाडो, चलावी धर्मने वसावो तथा ऋषिवर सेवकोनी सेवा स्विकारो. कर्या तमे करसो तमे, वर्या तमे, वरसो तमे. गुरुनर बेली अेक. आद्यअंत निष्कलंकी कायम अवतार. जंबुद्विपमा गुरुनरना परिवार. ऋषिवर सेवकोपर दया करो तथा कुळ विघ्ननो नाश करो. विनंती अमारी, दया दृष्टितमारी. वेगे जावो वहेलाआवो. कृपा करी वाडी वसावो सत स्वामीना नुर कांडी जपावो अजंपा जाप तमे उतारो अे सेवकना पाप. मुनिवर ऋषिवर सेवक नर नारी बाळ गोपाळनी आ संघमाथी (नाम) नी थाळ प्रसाद करावे ते स्विकार करो. सद्गुरु श्री इमामशाह ॐ श्री निष्कलंकी नारायणने नमो नम: ॥

हे भगवंता तू या संपूर्ण सृष्टीचा उत्पन्नकर्ता, पालनकर्ता व संहर्ता आहेस. तुझे अपरिमित तेज नूर या जगताला प्रकाशित करणारे आहे. आम्ही अपराधी जीवात्मे तुला शरण आलो आहोत. आमचा संपूर्ण अपराध क्षमा करून आम्हाला पावन करा. आमच्यावर कृपादृष्टी करून आमच्या भोजन गृहात, आमच्या मंदिरात, आमच्या पूजा घरात येऊन आम्ही सद्भाव प्रेमाने अर्पिलेला नैवेद्य स्विकार करा. पान, फूल, फळ, पालेभाज्या, निरनिराळे पेय-पाक प्रसाद अन्नपाणी, वस्त्र, भांडे, दमडी, दोकडा, कवडी, बदाम वगैरे जो कांही नैवेद्य अर्पण केलेला तो स्विकारावा. या सेवकांनी अनन्य भक्ति भावाने अर्पण केलेला हा नैवेद्य प्रेमाने स्विकारावा. हे भगवंता तू दाता ही आहेस आणि भोक्ताही तूच आहेस. तू अनंत कळा

धारण करून या सेवकांची विनंती स्विकारा. वर्तमान वेद वचनानुसार या जीवात्म्याला फळ द्या. या ऋषिवर सेवकाचा पापपरिमल दूर करा. या सेवकाच्या शेती, वाडी, व्यापार, उद्योगधंदा यांना बरकत द्या. या सेवकाची प्रार्थना स्विकारून आमच्या मनातील द्वेषभाव, मत्सर, निंदा, वैरभाव आमच्या हृदयातून काढून आम्हाला निर्मल पवित्र करा. या ऋषिवर सेवकाची सेवा स्विकारा. हे भगवंता कर्ताकरविता तूच आहे, भोक्ता भोगविताही तूच आहेस. कर्म करण्याचा अधिकार फक्त आमचा आहे. हे गुरुनर स्वामी तुझेच आम्ही बालक आहोत हे जबुंद्विप भरतखंड निवासी निष्कलंकी नारायणा! तुझ्या नूर निर्मल पवित्र जलाने आमचे सर्व पापपरिमल दूर कर. आम्ही तुलाच अनन्य शरण आलेलो आहोत. या संघामधून या अमूक अमूक नावाच्या स्त्रीपुरुष मनुष्याची थाळ प्रसाद करीत आहोत ती कृपा करून त्या जीवात्म्यास पोहोचवा व त्याचा कृपाशिर्वाद आमच्या पर्यंत पोहोचवा.

❋ ❋ ❋ ❋

प्र पदोऽव नेनिग्धि दुश्चरितं यच्चचार शुध्दैः शफैरा क्रमतां प्रजानन्।
तीर्त्वा तमांसि बहुधा विपश्यन्नजो नाकमा क्रमतां तृतीयम् ॥३॥
अथर्व कां. ९ सु. ५ मंत्र ३

पूर्वी जर काही दुराचार झाला असेल तर तो धुवून टाक आणि शुध्द पाऊल टाकून मार्ग आक्रमण कर. सर्व अंधकार ओलांडून जन्ममरणास दूर करून परम उच्च अवस्थेस प्राप्त हो.

वैश्वनराय प्रति वेदयामि यद्यृणं संगरो देवतासु।
स एतान्पाशान्विचृतं वेद सर्वानथ पक्वेन सह सं भवेम ॥२॥
वैश्वानरः पविता मां पुनातु यत्संगरमभिधावाम्याशाम्।
अनाजानन्मनसा याचमानो यत्तत्रैनो अप तत्सुवामि ॥३॥
अथर्व. कां. ६ सूक्त ११९ मं. २ व ३

२. जे ऋण मी केले आहे आणि त्यासंबंधी मी ज्या प्रतिज्ञा केल्या आहेत त्या सर्व मी निवेदन करतो. याप्रमाणे पापातून ईश्वर मला वाचवो. कारण तोच या बंधनातून मुक्त करून आम्हास वर काढण्याचा उपाय जाणतो. आम्ही पूर्ण ज्ञानासह राहू. जेणेकरून आम्हास काही दोष लागू नये.

३. ईश्वर सर्वांस पवित्र करणारा आहे. तो मला पवित्र करो. ज्या आशेच्या मागे लागून मी वारंवार प्रतिज्ञा करतो आणि पापास न जाणता सुध्दा वारंवार याचना करीत राहिलो आहे, ती सर्व पापे दूर होवोत.

